


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








## महाराष्ट्र राज्य अभिवादन विशेषांक






वर्ष २१ वें मे १९६५

मूल्य १। रु.

## श्रेयनामावली—

- **कथा :** एका महान संघर्षाची प्रभावी कथा (**कुंतीचा गर्भ—वा. रा. कान्त**) तिच्याजवळ देण्यासारखं खूप होतं, पण....(**अभिसारिका—प्रा. वसंत अ. कुंभोजकर**) पत्र वाचलं आणि तो जमिनीवर आला (**वदल—प्रेमानन्द वळवईकर**) तोफा गरजल्या, युद्धाला तोंडही लागले. पण अखेर.....(**एका महान युद्धाची कथा—भालचन्द्र सुळे**) बाळ गेला नाहीं. तो येणार आहे. नक्की येणार आहे—(**पुनर्जन्म : आनंद वर्टी**)
- **चालू कादंबरी : देवाला डोळे असतात—चार्लस् शॉ**—अनु : **प्र. श्री. नेरुरकर**
- **प्रवास वर्णन :** वसा कल्पनेच्या पंखावर आणि निघा (**शिबा राणीच्या शोधांत—दिलीप पु. चित्रे**)
- **खास लेखक : आणि त्यांनी इतिहास लिहिला**-अरविंद ताटके (राजवाडे शताब्दीच्या निमित्तानें)
  **रंगदेवतेच्या प्रतिष्ठेला जपणारा अभिनेता—स्पेन्सर ट्रेसी**— के. टी. देशमुख
  **अनपेक्षितपणें रंगलेली टेस्टमालिका—**बाळ. ज. पंडित
- **कविता :** भा. ज. कविमंडन, अंजलि ठकार, निर्मला देशपांडे, महाराष्ट्राची महापूजा (राजा वढे)

शिवाय

दीपमाला, सन्मानपुष्पें, रंगमंच, ऐसीं अक्षरें रसिकें, पानपुरी, वगैरे नेहमींची सदरें व भरपूर व्यंगचित्रें.

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : Dalalrt

✱ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
Published at : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4

अनुक्रमणिका






## दीपवळी

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफो न : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा** व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# अभिवादन महाराष्ट्रातें

**महाराष्ट्राचे** भीष्माचार्य, स्वातंत्र्य चळवळीचे एक झुंजार सैनिक योगी व कवि असे सेनापति बापट ह्यांच्या कवितेच्या ओळी मला आज आठवताहेत.

महाराष्ट्र मेला, तरी राष्ट्र मेले
मराठ्याविना राष्ट्रगाडा न चाले

ह्यांतला महाराष्ट्र आणि मराठा हा शब्द प्रांतवाचक वा जातिवाचक कधींही नव्हता व नाहीं. महाराष्ट्र आणि मराठा ही एक प्रकृति आहे. एक प्रवृत्ति आहे. ही प्रवृत्ति केवळ मानवी नाहीं, ऐहिक नाहीं. तर ती कांहींशी दैवी आहे. अध्यात्मिक आहे. तिनें सीमेच्या मर्यादा मानल्या नाहींत. कर्तृत्वाच्या मर्यादा मानल्या नाहींत. केवळ प्रांताचा विचार केला नाहीं. शिवरायांनीं स्वप्न पाहिले तें हिंदवी स्वराज्याचें. मराठ्यांच्या सेना पानिपतावर लढल्या त्या शनिवारवाड्यावरचा ध्वज सांभाळण्यासाठीं नाहीं, तर सीमेवरून येणाऱ्या गनीमांची आक्रमणें कायमचीं थोपवून धरण्यासाठीं. छत्रसालासाठीं पेशवे लढले ते कांहीं खंडणी वसूल करण्यासाठीं नव्हे तर आसेतुहिमाचल एकात्म भारत उत्पन्न करण्यासाठीं. राघोबा अटकेवर झेंडे लावायला गेला तो त्याला पेशवाई मिळणार होती म्हणून नव्हे तर महाराष्ट्र हा भारताचा खड्गहस्त आहे हेंच जणुं सिद्ध करण्यासाठीं! मराठ्यानें स्वप्नें पाहिली ती दिल्लीला तख्त रोंवण्याची ! भाऊनें घण घातले ते गुलामी तक्तावर. महाराष्ट्रांत दलितांना, दीन दुबळ्यांना, शूद्रांना परमेश्वराचीं द्वारें उघडणारे संत झाले. ज्ञानाचे मार्ग दाखविणारे ज्ञानदेव झाले. भक्तीचा मळा फुलविणारे वारकरी आणि अन्यायावर तुटून पडणारे धारकरी झाले. येथें कला फुलल्या आणि वाणी झिजली तीही ह्या देशाचें मंगल पाहण्यासाठीं. घडविण्यासाठीं! सर्वस्व गमावून तृप्तीचा आनंद मिळविणारे कलावेडे इथें झाले. आनंदवनाचें स्वप्न पहात पहात, त्यासाठीं माणसांना प्रेरणा देत देत वर्षानुवर्षे हिंडला तो राष्ट्रसंत रामदास इथलाच ! आणि स्वराज्याचें दान त्यांच्या झोळींत टाकणारा राजाही ह्याच मातीनें घडविलेला ! इथें अठराविश्वें दारिद्र्य नांदत असतांही र.जांचा नजराणा नाकारणारा तुक्या वाणी हें दैवत ठरते. इथें पराक्रमाबरोबरच व्यवहारही नांदतो. त्याग, समर्पण हा इथें 'स्वभाव' ठरतो. इथल्या उरांत नांदते प्रीति भारताची ! दिल्ली जाऊन मुंबई राहणार असेल तर महाराष्ट्र तें कधीं मान्य करणार नाहीं. महाराष्ट्र हवा तो दिल्लीची शान राखण्यासाठीं, हिमालयाचें रक्षण करण्यासाठीं. महाराष्ट्राची वैचारिक बैठक व्यापक आहे. म्हणूनच इथें संतांना, देशभक्तांना मान आहे. इथें प्रतिभेला आणि प्रज्ञेला पूजा लाभते. रामशास्त्री ही कूस धन्य करून जातो. महाराष्ट्र हा प्रांत नाहीं. मराठा ही जात नाहीं. आम्हीं जयजयकार करतो तेव्हां तो प्रांताचा संकुचित जयजयकार नसतो. तो त्या अदम्य अशा प्रवृत्तीचा जयजयकार असतो. राजा नसलेले राज्य त्या प्रवृत्तींतूनच औरंगजेबाशीं लढत राहिले आणि त्याची कबर इथें बांधली गेली ती त्या प्रवृत्तीतूनच ! उत्कटता हा आमचा स्थायीभाव आहे. म्हणूनच बंगालची फाळणी होते आहे असें कळतांच आमचा बाळ गंगाधर जणुं गायकवाड वाड्यावर वीज पडली अशा आविर्भावानें धांवून गेला. गोव्याच्या लढ्यांतही हेंच दिसलें. ह्या शतकाच्या प्रारंभी क्रांति इथं जन्मली आणि बापट, सावरकर, टिळक-खाडिलकर यांच्या नांवानें तिनें तिचें संचालन केलें. महाराष्ट्र राज्य निर्माण झाले ह्या संकुचित आनंदभावनेचा तो जयजयकार नाहीं. महाराष्ट्र जगवायचा प्रयत्न झाला तो ही प्रवृत्ति, प्रकृति, ही संस्कृति, हा इतिहास, हा तेजाळ वारसा जगविण्यासाठीं झाला. त्या साऱ्यांचे प्रतिक म्हणून महाराष्ट्राला अभिवादन !!

—संपादक












अनुक्रमणिका

# महाराष्ट्राची महापूजा



छत्रपति संभाजी राजांचा क्रूरपणानें वध करण्यांत आला. महाराष्ट्रांत प्रक्षोभ उफाळला. सांडलेले रक्त मराठी मातींत रूजून चैतन्याचें पीक फुलारून आलें. आणि मोंगली जुलमी सत्तेची कबर बांधण्यांत आली. आनंदव भुवन साकारलें. या पार्श्वभूमीवर हा पोवाडा रचलेला आहे.



दार उघड बये, दार उघड बये, दार उघड
मातले असुर निर्दाळी
घे त्रिशूळ हातीं आता भद्रकाळी

श्री महांकाळ कोपला वीर बलिभद्र
आकांत भयंकर तांडव करितो रुद्र

खवळली भुतें ही पांच कराया नाच, प्रलय संचरला
वादळांत अवघा भूमिभाग विचरला

कीं मेघ डफावर कडकड वाजे बिजली
डमडमलें डमरू सूर्यमालिका विझली

बेभान करी थैमान, पेटलें रान जलाशय फुटलें
घोंघावत वारे सुटले
अस्मानी वादळ उठले

आभाळ कोसळे उठती डोंगरलाटा
निखळल्या चांदण्या पृथ्वीगोल उफराटा

"वन्हि तो चेतवावा रे चेतविताच चेततो
केल्यानें होत आहे रे आधीं केलेंच पाहिजे"

उघडला अग्निचा डोळा जाळित नभा
खायास धांवती ळळळळ जळत्या जिभा
खळखळति अग्नि पेटवि गावोगावा

कडकडलि डफावर थाप, होय थरकाप, धडकली छाती
सांडुनी रक्त सिंचली मराठी माती

तसुं तसुं भिजविली भुई सांडुनी रक्त
तें चिताभस्म रुजविती आईचे भक्त

चैतन्य पीक निपजतां डळमळे तक्त
भरघोंस भालफळ उभे कराया शक्त

उगवले दुधारी कळे, त्रिशूळी मळे, तीर तलवारी
झेपावत लवती तीव्र पट्याच्या धारी
"मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा"

मावळातल्या मर्द मराठ्या घेइ सतीचें वाण
तुला श्री शिवरायाची आण

ऊठ ऊठ सांडलें रक्त हे देइ तुला आव्हान
तुला श्री तुळजाईची आण

स्वातंत्र्य हिंदवी रक्षाया घे तळहातावर प्राण
भवानी तलवारीची आण

घेइ झेंप हा क्रूर ससाणा पाड मारूनी बाण
लढवी अपुलें राष्ट्रनिशाण
उडवी रिपुची दाणादाण

तुडवित रिपुदल टापाखाली घोडदौड संचरे
हरहर हरहर महादेव गर्जती सह्याद्रिची शिखरे

शिवनेर, पुरंदर, प्रतापगड तोरणा
हा उभा रायगड स्वतंत्र्याचा कणा
हे चंदन वंदन अजिंक्य गड लिंगाणा
रक्तानें न्हाला पन्हाळगड कोंडाणा

परदास्य स्तुतीनें सुजली, तुटली तोंडें
फोडिले ठायिच्या ठायिं कुन्हाडी दांडे
कापली शिरे ती निवडुंगांची बोंडे

रणरंगीं फुलले पळस, तंबुचे कळस तणावे तुटती
मुंग्यांची पडली धाड वारुळावरती

पाण्यांत दिसे संताजि धनाजी बाजी असे रणगाजी
बसतांच मराठी हिसका, घेऊनी धसका थबकती वाजी
चेचले विषारी साप, अरीचे पाप लागता धाप

(आठवे बाप) टेकती गुडघे
मोंगली जुलुम गुर्मिचें बांधलें थडगे

अभक्ताचा क्षयो झाला आनंदवन भूवनीं
प्रसन्न झाली अंबा, स्फुरली स्वातंत्र्याची गाणीं
अर्घ्य द्यावया ओंजळ धरली उदंड झालें पाणी

भद्रा भीमा गोदा वरदा कृष्णा इंद्रायणी
महाराष्ट्राच्या ललाटरेषा जन जीवन दायिनी

एकत्वाचें बीज रोविलें या भिवरेच्या थडी
घेऊनी दिंडी मराठमोळा निघे वहाया कुडी

समता ममता भावभक्तीची उंच उभारी गुढी
वारकरी हो धारकरी तो संगरांत घे उडी

नाशिक त्रिंबक आळंदीही पैठण पंढरपुरी
तुळजामाता मायभवानी सोन्याची जेजुरी

सुबुद्धिदायक, अष्टविनायक सज्जन शिवथर घळी
शिवशक्तीचें शिखर शिंगणापुर घालते हळी

शाळु बाजरी गहूं हरबरा तूर ऊस लवथवे
कुळीथ साळी ज्वारी बाजरि पीक सुगीला नवे

आंबा काजू फणस अंजिरे पेरू सीताफळे
केळी नारळी चिकू संतरा नारंगी फोफळे

कलिंगडे करवंद टेंभरे बोरे वनजांभळे
ताड माड डाळिंब पोपई मधु द्राक्षाचे मळे

महाराष्ट्र जय महाराष्ट्र जय महाराष्ट्र माझा
रक्तफुलांनीं रणीं बांधली तुझी महापूजा
परकीयांतें खडे चारिले विजयाचे चौघडे
महाराष्ट्र मंदिरावरी हा भगवद्ध्वज फडफडे

— राजा बढे



अनुक्रमणिका




## फुलामुळें दोऱ्यालाही महत्व

स. न. वि. वि.

आपण अगत्यपूर्वक पाठविलेला "दीपावली"चा एप्रिलचा अंक पोंचला. त्यावद्दल हार्दिक धन्यवाद.

आपण अत्यंत जिव्हाळ्यानें लिहिलेल्या माझ्यावद्दलच्या मजकुरावद्दल आपले आभार मानावेत तेवढे थोडेच. "गुन नाही मोमे अव" या भूमिकेनेंच मी संगीताची आराधना केली. सुदैवानें गुरुकृपा आणि आपणासारख्या निर्मळ मनाच्या रसिकांच्या सदिच्छेनेच मी थोडेफार यश मिळवूं शकलो. अलिकडच्या सत्कार समारंभांत मला घातल्या गेलेल्या हाराविषयीं माझी हीच भूमिका होती. त्यांतील फुलांचे धनी मला संगीतविद्येचे भरल्या हातानें दान करणारे माझे अनेक गुरू होत. मी फक्त त्या हारांच्या सुताचा सेवक. फुलामुळें दोऱ्यालाहि महत्व येते ते हे असेंच!

आपणासारख्या रसिकांचा लोभ हीच आम्हा कलावंतांची खरी कमाई.

मी आपल्या मासिकास सुयश चिंतितो.

आपला

**ज. ज. पुरोहित (गुनीदास)**

## अगा, जें कळलेंचि नाहीं !

स. न. वि. वि.

"दीपावली" (एप्रिल ६५) चे संपादकीय "नवें जुनें आणि चांगलें" वाचलें. आपल्या संपादकीयात टीका व टीकाकार यांचेवर आपण वरीच आग पाखडली आहे व त्या संदर्भात—"परवां एका प्राध्यापकानें 'वाईचा' बुरखा घेऊन एका 'सभ्य' मासिकाची टोपी उडवली. प्रेक्षक खूष!" असें विधान केले आहे. (मला वाटते "सत्यकथा" ह्या मासिकाबावत व त्यांत प्रसिद्ध झालेल्या "त्या" कवीच्या 'त्या' कवितेवावत हा संदर्भ असावा.) संपादक महाशय "त्या" मासिकाचे संपादक तेवढे प्रामाणिक, इ.इ. आणि 'तो' कवी—ज्यानें संपादकाच्या "दृष्टिकोणावर" (कविता स्वीकारण्याच्या वावत) 'प्रकाशझोत' टाकला—मात्र दोषी का? आपण साहित्याची निवड कशी करतो ह्या प्रश्नावर संपादक महाशय —एकूण "जातच" जे वोलत असतात (मग त्यात गुणवत्ता, कोणत्याहि मोठ्या साहित्यिकाचा तो मोठा म्हणून आम्ही कसा मुलाहिजा ठेवीत नाहीं; आम्ही फक्त साहित्याची गुणवत्ता पहातो; आम्ही गटवाजी करीत नाही इ. इ.) ते मोठे ऐकण्यासारखे असते व बहुतेक संपादकांची ती 'रेकॉर्ड' ठरलेलीच असते. अशा परिस्थितीत 'जें' पितळ उघडे पडले त्यावावत संपादकांची वाजू घेऊन आपण त्या कवीवर आग पाखडावी हे आश्चर्यच (पण आपणही संपादक आहात हे मी विसरलो) तेव्हां संपादक, मालक, इ. सर्व "योग्य" व लेखक, वाचक हे मात्र नेहमीच मूर्ख, चुकणारे असा दृष्टीकोण कृपया वाळगूं नये. खरें म्हणजे "त्या" संपादकावरच आपण टीकास्त्र सोडावयास पाहिजे होते.

आपला

कल्याण **धुंडिराज ना. वैद्य**

## विशिष्ट दर्जा कायम राखला

स. न. वि. वि.

मुद्दाम पत्र लिहिण्याचे कारण, परवां आपल्या मासिकाचा अंक वाचला. आपल्या मासिकाच्या वाढदिनाच्या निमित्ताने आपले अभिनंदन करतो. परमेश्वर चरणी आपल्या मासिकाची उत्तरोत्तर भरभराट होवो अशी सदिच्छा व्यक्त करतो.

मला वाचनाचा नाद असल्या कारणानें मी 'दीपवाली' अंक नियमित वाचतो. आपल्या मासिकानें स्वतःचा एक विशिष्ट दर्जा कायम राखला आहे. एक विशिष्ट वाचक वर्ग निर्माण केला आहे. अश्लील मासिकांच्या भाऊ-गर्दीत व त्यांच्या वाढत्या खपांत समाज कोठल्या दिशेस वाहतो आहे हे मला पूर्णपणें माहित आहे, कारण, मी एका छोट्या लायब्ररीचा ग्रंथपाल आहे. आपलें 'मासिक' आमच्या लायब्ररीत दरमहा घेतले जाते.

आपल्या मासिकांतील पु. भा. भावे यांचे लेख मला फार आवडतात. पु. भा. भावे यांच्या लेखणीला तरवारीची धार, हिंदुत्वाची निष्ठा, साहित्याचे म्यान आहे. त्यांच्या कट्टर हिंदुत्वामुळे, प्रखर निष्ठेमुळे भारतीय-अभिमानाचा प्रत्यय त्यांच्या 'उत्तर दिग्वीजय' या लेखमालेंत दिसून येते. ही लेखमाला खरोखरच सुंदर आहे. प्रत्यक्ष प्रवास केल्याचे समाधान या लेखाने मिळते. ज्ञान व मनोरंजन या दृष्टीने ही लेखमाला औचित्यपूर्ण आहे. पु. भा. भावे, जयवंत दळवी, पु. ल. देशपांडे सारखे सिद्धहस्त लेखक आपल्या मासिकास साहित्य पुरवित असल्यानें आपल्या मासिकाचा दर्जा निःसंशय श्रेष्ठ आहे.

दळवी यांची मुंबईचा 'मोरू मुंवईस जातो' ही लेखमाला सुंदर, ज्ञानवर्धक, मनोरंजक मिस्कील लेखनाची वाटली.

आपला

कोल्हापूर **सु. द. भडभडे**

## आकर्षक व विविधतापूर्ण

स. न. वि. वि.

आपल्या कार्यालयाकडून आजच 'दीपावली'चा ताजा अंक मिळाला. मी आपला अत्यंत आभारी आहे. श्री. अत्रे यांनी घेतलेली कुसुमाग्रजांची मुलाखत अतिशय लक्षणीय आहे. त्यांचे अभिनंदन करावयास हवे. 'दीपावली'चे स्वरूप आकर्षक व विविधतापूर्ण आहे.

आपला

औरंगाबाद **प्रा. गजमले माळी**










# आणि ह्यांनी "इतिहास" लिहिला

-अरविंद ताटके

**[ रियासतकार सरदेसाई जन्मशताब्दी निमित्त दिवंगत इतिहासकारांचे–संशोधकांचें धांवते स्मरण करून देणारा एक खास लेख ]**

इतिहासकार राजवाडे

**या** महिन्यांत रियासतकार सरदेसाई यांच्या शताब्दीची धूम मोठ्या थाटामाटांत उडेल. तेव्हां या समयीं, ज्या ज्या व्यक्तींचा मराठी इतिहासाशीं – ऐतिहासिक ग्रंथांशीं संबंध आला, त्यांचे स्मरण होणें साहजिक आहे. मराठी इतिहास प्रथम युरोपियन लेखकांनी लिहिला; तेव्हां त्यांचेहि ऋण आपल्यावर असल्यानें त्या सगळ्यांचें स्मरण करणें उचित होय.

तो पाहिलांत कां छत्तीस वर्षाचा तरुण, प्रकाशकाशीं कशी हुज्जत घालतो आहे ती. पण तरी कांही त्याची दाद लागत नाही. तेव्हां प्रकाशकानें काढली तोड. तो त्याला म्हणाला, "तुझ्या ग्रंथाचं, 'मराठ्यांचा इतिहास' हें नांव बदल बुवा. हें नांव ठेवलंस तर खपाची आशाच नको. "काय म्हणतां, नांव बदलूं ! तें कालत्रयींहि शक्य नाही." त्या तरुणानें जबाब दिला. पुढें त्यानें वीस हजार रुपये पदरचे खर्च केले अन् केला आपला ग्रंथ प्रसिद्ध. आहे कीं नाहीं जिद्द ! त्या ग्रंथाचें नांव 'ए हिस्टरी आफ दि मराठाज्.' तो पहा निराश होऊन रंगो बापूजी इंग्लंडांतून इकडे परतत आहे. त्याच्या इंग्लिश मित्रांनी एक चांदीचें तबक सह्या करून त्याला दिलें बक्षीस. त्यांत ह्या तरुणाचीहि सही होती बरं का ! या तरुणाचें नांव ग्रँट डफ; मराठ्यांचा आद्य इतिहासकार तो हाच. आमच्या शेवटच्या छत्रपतींचें– प्रतापसिंह भोसल्यांचें स्मरण करीत करीत यानें इंग्लंडांत देह ठेवला. याच्या ग्रंथावर राजवाड्यांनी सडकून टीका केली खरी. पण याचा ग्रंथ मात्र ते सतत जवळ बाळगीत.

तो पहा रावबाजी, (दुसरा बाजीराव) पन्नाशीच्या घरांत असलेल्या गृहस्थाच्या हातावर मराठी राज्याचें उदक सोडीत आहे. मग या गृहस्थानें रावबाजीची रवानगी केली ब्रह्मावर्ताला, हरी हरी करण्यासाठीं. काय म्हणतां ? हा गृहस्थ राक्षसासारखा दिसतो ! हो. हो. आहे खरा हा धिप्पाड. शिकारीचा हा फार नादी. तहाच्या वाटाघाटी एकदां ऐन रंगात असतांना त्या टाकून हा गेला वाघाच्या शिकारीला. शिकारीत जसा शूर तसा लेखणीचाहि हा मोठा बळकट बरं का ! आमचें मराठी राज्य गेल्यावर बरोबर सहा वर्षांनीं यानें 'मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया' हा अप्रतिम ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ इतका चटकदार कीं, त्याच्या आधारावर आमच्याकडे पुण्यश्लोक अहिल्याबाईंवर अनेकांनी सुरस चरित्रें लिहिलीं. या लेखणीबहाद्दर शिपाईगड्याचें नांव सर जॉन मालकम !

ती पहा तिकडे बसली आहे नाना फडनवीसांची बायको जिऊबाई. तिच्याशी बातचीत करीत बसला आहे एक तिशींतला तरुणाबांड युरोपियन गृहस्थ. आपल्या गोड वाणीनें त्यानें तिची मर्जी केली संपादन अन् मिळविली तिच्याकडून नानांच्या दप्तरांतली ९ हजार अस्सल पत्रें. मग हा गेला इंग्लंडला. प्रथम त्यानें नानांच्या आत्मचरित्राचें केलें भाषान्तर. त्यांचें चरित्र लिहावें अशीहि स्फूर्ति झाली याला. प्रकाशकाची अडचण होतीच उभी. ग्रँट डफ त्याला म्हणाला, "तुझ्या नानांच्या चरित्रांत कांहींतरी अलीकडच्या इतिहासाचा खमंग अन् मनोरंजक मालमसाला घाल." पण त्याच्या हातून नानांचें चरित्र पार पडलें नाहीं. या युरोपियनाचें नांव जनरल ब्रिग्ज. हा सातारला रेसिडेन्टहि होता. प्रतापसिंहाचा व डफचाहि हा निकट स्नेही होता.

ते पहा खडकी येथील तंबूत तीन गृहस्थ बसले आहेत. मसलत चालली आहे शनिवारवाड्यावर झेंडा लावण्याची. एक आहे वरीष्ठ अधिकारी अन् दुसरा त्याचा दुय्यम. तिसरा आहे बाळाजीपंत नातू. मराठी राज्य कोलमडलें होतें पण पेशव्यांच्या वास्तूवर–शनिवारवाड्यावर युनियन जॅक लावण्यास कुणी धजेना. तेवढ्यांत बाळाजीपंत नातू म्हणाला, "मजबरोबर २५ स्वार द्या म्हणजे मी निशाण रोवून येतो." तेव्हां त्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें मान डोलावली. कोण होता तो ? त्याचें नांव माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन. हा मोठा विद्याव्यासंगी पुरुष. प्रवासांत याच्याबरोबर असलेल्या उंटांच्या पाठीवर ग्रंथांचे भारे असायचे. येथील जनता सुविद्य व्हावी याविषयीं याच्या मनांत तळमळ होती. हा मुंबईच्या गव्हर्नरपदावरून निवृत्त झाला तेव्हां लोकांनी त्याला मानपत्र देऊन त्याचा सत्कार केला.





अनुक्रमणिका

पेशवाईंतली ब्राह्मणांना दक्षणा देण्याची प्रथा यानें चालू ठेविली. ग्रँट डफला मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास यानेंच प्रोत्साहन दिलें. इंग्लंडात गेल्यावर स. १८४१ मध्यें यानें 'हिस्टरी ऑफ इंडिया' हा ग्रंथ लिहिला. तो विद्वज्जनांत एवढा मान्यता पावला कीं त्याच्या पांच आवृत्त्या निघाल्या. आमच्याकडील रावसाहेब मंडलिकांनी या ग्रंथाचें भाषांतर मराठींत केलें.

चला आतां नाना फडनवीसांच्या मेणवली गांवी. पाहिलांत कां त्यांचा तो वाडा ? कोण बसलंय तिथं ? नानांचे वंशज आहेत तिथें. समोर कागदपत्रांचा ढीग आहे. पलीकडे एक युरोपियन, हे कागद विचडीत बसला आहे. वाडेच्या वाडें पहातो आहे. त्याची बैठक अगदीं दांडगी दिसते. कां हो उठला कीं हा ! मग गेला इंग्लंडांत अन् लिहिलें त्यानें नानांचें फक्कड चरित्र. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या सहा वर्षें आधीं हें चरित्र इंग्रजींत प्रसिद्ध झालें. त्याचें मराठींत भाषांतर १८५२ सालीं झालें. पुढें चाळीस वर्षांनी नानांचें सुरस चरित्र मराठींतहि प्रसिद्ध झालें. पण तें लिहिण्याचा पहिला मान या युरोपियनाचा. याचें नांव मॅकडोनल्ड बरं का !

चला आतां पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत. हें साल आहे १८६७. कॉलेजांत 'पूना यंग मेन्स असोसिएशन' नांवाची, विद्यार्थ्यांना वक्तृत्व कलेंत तरबेज करण्यासाठीं एक संस्था होती. तिथें एकवीस वर्षांचा एक तरुण भाषण करीत आहे. काय बोलतो आहे तो ? एखाद्या घनपाठ्याप्रमाणें धडधडा तो ग्रँट डफच्या इतिहासांतल्या चुका दाखवीत आहे. त्याचें नांव नीलकंठ जनार्दन कीर्तने. हे मराठी इतिहासाचे आद्य टीकाकार. त्यांची ही टीका म्हणजे आपल्या मराठी इतिहास प्रकाशनाची नांदी बरं का ! डफवरील टीकेमुळें सुशिक्षितांत इतिहास विषयाची गोडी उत्पन्न झाली. त्याचेंच फळ 'काव्येतिहाससंग्रह' हें मासिक होय. हें मासिक १८७८ सालीं निघालें. का. ना. साने, मोडक व विष्णुशास्त्री चिपळूणकर असे त्रिवर्ग या मासिकाचे संपादक होते. हें मासिक एक तप चाललें. त्या अवधींत त्यांत छोटे मोठे २३ ग्रंथ, ५०१ कागदपत्रें, (ऐतिहासिक) २० संस्कृत काव्ये व १० मराठी काव्यसंग्रह प्रसिद्ध झालें. सुमारें ६३०० पृष्ठांचें साहित्य त्यांतून प्रसिद्ध झालें. या मासिकापासून साने, खरे, राजवाडे, पारसनीस व भावे ह्या आमच्या 'इतिहासपंचायतना'नें स्फूर्ति घेतली अन् मग त्यांनी इतिहास क्षेत्रांत प्रचंड कामें केलीं. चला आतां त्यांची ओळख करून घेऊं.

हे रा. ब. का. ना. साने. यांच्या काशिनाथ नांवातला 'शि' ऱ्हस्वच लिहावा लागे. कुणी अनवधानानें तो दीर्घ लिहिला कीं हे खवळलेच. पण माणूस अगदीं व्यवस्थित अन् टापटिपीचा. तसाच सडेतोड नि निःस्पृहहि. विष्णुशास्त्री चिपळूणकरांना खडसावण्यास त्यांनी कमी केलें नाही. आमच्या भारत इतिहास संशोधक मंडळाचे हे बरीच वर्षें अध्यक्ष होते. पेशव्यांची बखर, पानिपतची बखर, भाऊसाहेबांची बखर इत्यादि मिळून त्यांनी पंधरा बखरी संपादित केल्या. यांचा जन्म १८५१ मधला. राजवाड्यांहून हे १२–१३ वर्षांनी मोठे पण त्यांची गणना त्यांच्या समकालीनांतच होते. होळीपौर्णिमेच्या दिवशीं शिवकवचाचा पाठ ऐकतां ऐकतां कल्याण येथें १९२७ सालीं हे कालवश झाले.

हें कुठलें गांव आहे कां माहित ? अहो हें तर पटवर्धनांचें मिरज गांव. रात्र काय काळीकुट्ट पडली आहे ! पण तिथें एका घरांत, सतरंजीवर बसलेल्या एका गृहस्थाला त्याची काय फिकीर ! काय उद्योग चालला आहे विचारतां त्यांचा ? सतरंजीच्या वाती करून समई पेटवली आहे त्यांनीं. तिच्या मिणमिणत्या प्रकाशांत ते लिहित बसले आहेत. चार लक्ष ऐतिहासिक कागदपत्रांचा ढीग त्यांच्या पुढ्यांत पडला आहे. व्यवसाय विचारतां त्यांचा ? मास्तर आहेत मास्तर. लागले पंधरा रुपयावर, अखेरचा पगार होता पंचेचाळीस रुपये अन् पेन्शन मिळे अवघे पंधरा रुपये. पण तरीहि ते मोठे मानी, निःस्पृह अन् कुणाची भीडभाड न ठेवणारे होते. एकदां एका संस्थानिकानें यःकश्चित हुजऱ्यासमोर त्यांना त्यांचें नाटक वाचण्यास सांगितलें. तेव्हां हे पाठ फिरवून घरी आले. हुजऱ्यासमोर नाटक वाचणें हा आपल्या बुद्धीचा अपमान आहे असें त्यांनी मानलें. या बाणेदार गृहस्थाचें नांव वासुदेवशास्त्री खरे. नानाफडनवीसांचें विस्तृत अन् साधार चरित्र मराठींत प्रथम ह्यांनींच लिहिलें. 'ऐतिहासिक लेखसंग्रहाचे' १५ खंड यांच्या नांवे आहेत. त्याची पृष्ठें आहेत ८४४३. लेखसंग्रहातली पत्रें १७३९ सालापासून ते जवळ जवळ पेशवाईच्या अखेरपर्यंत आहेत. त्यांची इतर ग्रंथरचनाहि मौलिक असून त्यांच्या नाटकांनीहि त्यांना चांगला नांवलौकिक मिळवून दिला. नाटकें लिहिणारे हे पहिलेच इतिहाससंशोधक. 'मराठे व इंग्रज' या ग्रंथाला त्यांनी लिहिलेली प्रस्तावना नमुनेदार ठरली. आमचे तात्यासाहेब केळकर यांचे आवडते विद्यार्थी बरं का ! शास्त्रीबुवा जसे संशोधक होते तसे साहित्यिकहि होते. त्यांनी नाटकें लिहिलीं व काव्यें रचलीं. त्यांचें 'गोपिकाबाईचा पुत्रशोक' हें काव्य आजहि वाचलें तर डोळ्याला पाणी येईल. ह्यांचा जन्म १८५८ मधला. राजवाड्यांचे हे मित्र होते. त्यांच्या घरून दशम्या घेऊन राजवाडे प्रवासास निघत. शास्त्रीबुवा जून महिन्यांत १९२४ सालीं निवर्तले. तेव्हां तात्यासाहेब केळकरांनीं त्यांच्या मृत्युलेखांत म्हटलें. "उपास तर उपास काढून, पायाने मजला मारून, प्रहरानुप्रहर दप्तरें चिवडून, आपल्या हातानें नकला करून, परगावीं बसून प्रुफें वाचून, व पुढच्या ग्रंथाच्या विक्रीने छापखानेवाल्यांचें मागच्या ग्रंथाचें कर्ज फेडून–तात्पर्य शक्य तितक्या अडचणी सोसून खरेशास्त्री यांनी इतके ग्रंथ छापून काढले कीं, पुणें-मुंबईसारख्या विपुल साधन संपन्न शहरीं राहण्याऱ्या श्रीमान संशोधकासहि त्यांचा हेवा वाटेल."


रियासतकार सरदेसाई

पुण्यास आपलें भारत इतिहास संशोधक मंडळ आहे ना ! तें कुणी काढलें आहे कां माहीत ? इतिहासचार्य वि. का. राजवाडे यांनी १९१० सालीं तें स्थापन केलें. आमचे राजवाडे पैशानें कफल्लक.

( पृष्ठ ५४ वर पहा )






मी स्वतः प्र त.काळीं सूर्योदयानंतरच्या पहिल्या अर्ध्या तासांत
(छायाचित्र-जॉर्ज स्माईथ्)

—दिलीप पुरुषोत्तम चित्रे

**सॉलोमनला भेटायला शीबा हीं पठारें उतरून गेली. तिचं काळंभोर लावण्य मी हे उतार आणि चढ आठवतांना बघतो. निष्ठुर काळे स्तन आणि जांभुळसर स्तनाग्रं : संध्याकाळच्या ओसरत्या आफ्रिकन उन्हांत...**

विमान तांबडया समुद्रावर चढलं आणि गरमी वाढायला लागली. ग्लासभर बिअरची आंतडयांत वाफ होऊन गेली. डोकं थोडंसं दुखायला लागलं. खालीं बघावं तर सतत तांबूस हिरवा समुद्र. जहाजांनी फाळलेलं पाणी. लाल टेकाडांवरले हिरवे खुंट आणि समांतर वाळवंट.

तासाभरांत जिबुतीला विमान उतरलं. बाहेर पडलों आणि वाळूवरून आलेल्या गरम झळी अंगावर आल्या. सिमेंटचा पांढरा, गरम तळ. रुक्ष शांतता. चिरंडीला आलेले पंधरावीस प्रवासी एका जुनाट लहान विमानांतून बाहेर पडून गप्प चाललेले. झळींचे लोट. गरम रुक्ष शांतता. एक वाटेवरलं ठिकाण. जिबुती.

....थोडयाच वेळांत इथिओपियन एअरलाइन्सचे हिरवे-पिवळे-तांबडे पट्टे काढलेलं आणि सिंह-छाप विमान घरघरत थांबलं. नाका तोंडांतून आग बाहेर पडत होती. वाळवंटावरला कोरडा गरम वारा अंगाला डंख करत होता. गळयांतल्या पिशव्यांसकट सगळे कॉंक्रीटच्या गच्चीवरून उतरून तळावरून विमानाकडे चालत गेले. मुक्काम हलला. विमानाचं दार बंद झालं; पंखे फिरायला लागले...मग तें हवेवर चढलं.

आम्ही हवेवर उंचल खाल्ली. सुरळ उंच तिरकांडी घेत विमान वर गेलं तेव्हां भानावर येऊन मी बाहेर पाहिलं तर इथिओपियाचे पहाडी तट एका ॲल्युमिनियमच्या तळपत्या पंखाखालीं दिसत होते. करडे निसरडे घसरडे उतारांचे पहाडी उत्पात.

लाव्हाच्या आंठ्या. शिखरांची सुळकेदार जरव. तळहातावरच्या शंख-चक्रांसारखी पर्वतांची चक्र भिंत. आणि पलिकडे दोन डोंगरांमधल्या जबरदस्त चिंचोळ्या खिंडीपलिकडे पालथं पडलेलं शुक्राच्या उंचावट्यासारखं पठार. त्यावर जंगलांची हिरवी लव आणि मधेंच एखादी बारीक नदीची ठळक तळपणारी रेघ. संध्याकाळच्या ओहोटणाऱ्या उन्हांत मागें पडणाऱ्या मुलुखांच्या डोंगराळ पालख्या. तरी आम्हींच हवेवर होतो. लाव्हाचा थिजलेला धबधबा चढून जाणारे आमचे डोळे. थोडा वेळ मला नुक्तेच उखडलेसे डोंगर आणि त्यांचा तत गिलावा तेवढा दिसला. नंतर आम्हीं ओलांडली शेतं, पठारं, उतार, दऱ्या, आणि टेकाडं.........

ह्या डोंगरांमुळे इथिओपियाला एक अलगद अलगपणा आणि मुलुखाचं वेगळेपण मिळालं. सॉलोमनला भेटायला शीबा ही पठारं उतरून गेली. तिचं काळंभोर लावण्य मी हे उतार आणि हे चढ आठवतांना बघतो. निष्ठुर काळे स्तन आणि जांभुळसर स्तनाग्रं: संध्याकाळच्या ओसरत्या आफ्रिकन उन्हांत, आणि ती पाशवी मग्न स्तब्धता. एक पांचसुरी गाण्याची सर्पाकृति लकेर. एक फत्तरी चर्च. निळ्या नाईलचा उगम. उपदेश आणि गच्च एकांत. रॅंबोचा सुजलेला गुडघा आणि माझंच स्वत:चे थोबाड. थोबाड आणि पहाड आणि गुडघा. एक देश....

हुरुप. उत्सुकता, विस्फारलेलं हृदय. माझी मजल, दरमजल.. संध्याकाळीं – नक्की वेळ आठवत नाहीं–पण सूर्यास्ताच्या अगोदर एक डोंगर उलटला आणि अचानक आदिसअबाबा दिसलं. टेकाड ओलांडून विमान सपाट तळावर उतरलं आणि आमचे पाय जमिनीला लागले.

एकेकदां हें उलट सुलट झालेलं आहे. एकदां बेरीज. एकदां वजाबाकी. तीन वर्षांचा मुक्काम. आणि पुन्हां हललेला तळ.

आतां प्रवास म्हटला कीं, समोर दिसतो तो सपाट सिमेंटचा विमानतळ. काळोखांतली थंड ॲल्युमिनियमच्या रंगाची विमानं. एखाद्या पंख्याचा घरघराट किंवा एखाद्या जेटचा काळोख फाडणारा आवाज. मिनिटभर गरंकन् फिरलेलें जांभळे लाल दिवे. हालणाऱ्या हांका आणि हातरूमाल. प्रेशराईझ्ड पोकळींत चढलेले हवेचे हजारों फूट. आणि मोकळीं होणारीं वर्षं.

[२]

मुलुखाचे देखावे. आदिसअबाबाहून मुक्काम हलला आणि अरुस्सी प्रांतांत अस्लेल्या ह्या राजधानीच्या गांवीं जायला निघालो. गारठा. तोंडांतून वाफा बाहेर पडत होत्या. मर्कातो नांवाच्या आदिसअबाबांतल्या मुख्य मार्केटमधून बाहेरगांवीं जाणाऱ्या बसेस् निघतात.

पहांटच्या अधुऱ्या प्रकाशांत आम्हीं मर्कातोंत पोंचलो. मार्केटमधलीं दुकानं बंद होती. टोपल्या, पेटारें, सुकं गवत, घाणेरडा रस्ता, गुत्ते, नुक्त्या जाग्या झालेल्या वेश्या, पेंगणारे अरब, ओव्हरकोट आणि खाकी सन् हॅट् घातलेला एक घिप्पाड म्हातारा इथिओपियन. आणि अम्हारिक भाषेंत चाललेली कचकच, गोंगाट.

"फरंजी! फरंजी!"–म्हणजे फिरंगी, फिरंगी. सर्वच परदेशी लोक फरंजी म्हणवले जातात. बाहेरच्या जगाशीं कधींच संबंध न आलेला इथिओपियन माणूस एकदम सावध होतो, मग दूर सरकतो. आम्हीं तासभर बसमध्यें बसून राहिलो. मग एकदम ड्रायव्हर आला. एकदम धांवपळ आणि गिल्ला. अंगाला शिळ्या लोण्याचा वास यणाऱ्या, जाळीदार हिरव्या रूमालांत केस बांधलेल्या बाया आंत शिरल्या. त्यांतल्या एकीजवळ एक एकाक्ष मांजर होतें आणि तें प्लॅस्टिकच्या बाटलींतून दूध पीत होतं! एखादी बाई बिनदिक्कतपणें अनोळखी पुरुषाच्या मांडीवर बसत होती किंवा त्याच्या अंगावर बिनधोक रेलत होती. क्वचित एखाद्या बाईच्या अंगावर देशी वेष दिसायचा – एरव्ही सगळ्या दरिद्री झग्यांतच होत्या. इथिओपियन बाईचा वेष म्हणजे तलम मलमलीसारखे शुभ्र सुती कापड–त्याला हिरव्या काळ्या किंवा गुलाबी जांभळ्या रंगाचे साडीसारखे कांठ–ह्यांचा एक फ्रॉक आणि पंजाबी ड्रेसवर द्यावी तशी उरावर ओढणी. पुरुषहि मलमलीसारख्या ह्याच कापडाचे कपडे वापरतात. सुरुवारीसारखी गुडघ्यापर्यंत तंग तुमान आणि वर पुष्कळसा झब्ब्यासारखा दिसणारा अंगरखा; आणि छाती-पाठीवर गुंडाळलेला 'शाम्मा'–शाल, शेला, उपरणे सगळे मिळून जें होतें तें. हेंहि पांढरंच आणि ह्यालाहि नक्षीदार काठ.

इथिओपिअन चेहरे: हबशी. हबेश्शा. अरबी शब्द: मिश्र जातीचे लोक. ह्यांच्यांत नीग्रो, सेमेटिक, हॅमिटिक, (आणि गेल्या पन्नास वर्षांत जरासं) युरोपियन रक्तांचं मिश्रण. वर्ण तांबूस गोऱ्यापासून थेट काळाकुट्ट–यांच्या दरम्यान, अम्हारा आणि तिग्रे वंशांचे लोक जास्त रेखीव. सरळ नाक. जरा उजळ वर्ण. मोठाले डोळे. चेहऱ्याचे सर्व कट्स् सहसा रेखीव. गाल्ला काळ्या वर्णाचे. पण देखणे क्वचित् सुंदरहि. गुरागेसुद्धां काळेच. सर्वांचेच केस जाड आणि कुरळे. बहुतेक सर्व लोक जिवंत आणि शेलक्या, लयदार हालचाली करणारे. स्नायूंची कातीव वळणं. स्त्रिया चालतांना हंड्यांसारखे हेलकावणारे त्यांचे कुल्ले. पुरुष चित्त्यांसारखे चालणारे. आणि सतत नाचांत पडावीत तशी पावलं.

सगळीं निरीक्षणं एकाच एका वाक्यांत घुसतात. वाक्य फुटतं, फुटकळतं, आणि शब्दाचे लाख जमाव बाहेर पडतात. काळ चारी दिशांनी एकाच ओळींत शिरतो आणि कशालाच अनुक्रम उरत नाहीं. काय !

आणि बस सुरूं झाली. जातां जातां दिसले डोंगर, सरोवरं. ज्वालामुखांतलीं गंधकाचा वास येणारीं सरोवरं. लाव्हाच्या घळ्या, कातळ, कडे, खडबडीत पहाडचेहरे. तो झुक्वाला. त्याच्या शिखरावर ज्वालामुख आहे त्याचं सरोवर झालंय्. बिशोफ्तू गांव मागे पडलं. दुतर्फा शेतं. "उधळाल तें उगवेल

( पृष्ठ ५७ वर पहा )







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





*खरंच, ह्या घरांत मला काय किंमत आहे ? जसा एक फ्रीझर आहे, रेफ्रिजेटर आहे, रेकॉर्ड प्लेअर आहे, टेप रेकॉर्डर आहे, धुलाईचें यंत्र आहे तशीच मी एक ! ....तशीच !!*

# कांक्रि सारिका

**उपनगरांत** नव्यानं उभी राहाणारी एक विस्तीर्ण वसाहत. नुकताच बांधून पूर्ण झालेला एक कोरा करकरीत बंगला. अद्ययावत् बांधणीचा. भव्य तरीहि नखरेल आणि देखणा. तिसऱ्या प्रहरच्या झुकत्या उन्हानं कांचेचीं मोठमोठीं बिलोरी तावदानं झळाळताहेत. सगळ्या बंगल्याला आणि त्या भोंवतालच्या आवाराला, छाती इतक्या उंचीच्या काँक्रीटच्या जाळीदार भितीनं आपल्या चौकोनी मिठींत वेढलं आहे. जाळीच्या चौकोना चौकोनाची नक्षी, तिरकस उन्हामुळें करकरीतपणें नजरेंत रूतत आहे. या कंपाऊंडच्या मध्यावर चंदेरी रंग दिलेलं लोखंडी फाटक आहे. या क्षणीं तें फाटक बंद आहे. पसरट इंग्रजी 'व्ही'च्या आकाराची, बंगल्याची गिर्रेबाज आगाशी फक्त एकाच निमुळत्या खांबावर वरच्या दोन्ही पंखांचा तोल संभाळून उभी आहे. फाटक आणि आगाशी यांच्या बरोबर मध्यावर उत्फुल्ल कमळाच्या आकाराच्या पुष्करणींतील कारंजाचं काम अपुरंच झालं आहे. भोंवताली लावलेल्या बगीच्याची केवळ रचनाच ध्यानांत यावी, इतपत फुलझाडं जमिनींतून वर आलीं आहेत. त्यामुळं बंगल्या भोंवतालचं आवार, सगळं भगभगीत भासत आहे. व्हरांड्यांत आणि दिवाणखान्यांतहि सगळी सामसूम आहे. लंब वर्तुळाकृती दिवाणखान्याची जमीन, रंगादार अशा तुकतुकीत लिनोलियमनं आच्छादली आहे. त्यावरचा सोफासेट आणि टीपॉय यांची अर्धवट प्रतिबिंबं लिनोलियमच्या पृष्ठभागावर उमटली आहेत. टीपॉयवर **एक** उर्ध्वबाहू तरुण स्त्रीच्या आकृतीचा सुबक फ्लॉवर पॉट आहे. त्या तरुणीनं उंचावलेल्या हातांत, फुलें खोवण्याची योजना आहे. त्यांत या क्षणीं मात्र फुलं नाहींत. तिनं नुसतेच हात वर केले आहेत. या रिकाम्या हातामुळं संपूर्ण सुसज्ज दिवाणखान्यालाच एक प्रकारचा रितेपणा जाणवत आहे. सोफासेटच्या मागच्या बाजूनं एक गिरकी घेऊन वर गेलेला जिना, मॅटिंगनें मढविला आहे आणि तो जिना जिथं संपतो, तिथं ललिताबेनची खोली आहे.

एखाद्या हॉलच्या आकाराची ती खोली आंतून बंद आहे. आंतली हवा एकदम थंडगार आहे. सगळ्या खिडक्यावरून गडद काळपट हिरव्या रंगाचे पडदे सोडले आहेत. त्या पडद्यावर सूर्यकिरणं बाहेरच्या बाहेर थबकली आहेत. त्यामुळं खोलींत एक प्रकारचा हिरवा प्रकाश, म्हटला तर हिरवा अंधार, कोंडून राहिला आहे. एअरकंडिशनिंगच्या यंत्राचा सूक्ष्म आवाज, त्या हिरव्या अंधारांत विरून गेला आहे. आणि खोलीमधल्या गारव्याला एक प्रकारचा मधीर गंध येत आहे.







महॉगनी लाकडाच्या, आरशागत चकचकीत पॉलिश केलेल्या डबलबेडवर निम्म्या भागांत, ललिता पहुडली आहे. अंगावरची तलम साडी अस्ताव्यस्त होऊन एका बाजूला गोळा झाली आहे. सावरीच्या मऊमऊ कापसानी ठिचून भरलेल्या आणि पोपटी रंगाच्या रेशमी बेडशीटनी आच्छादलेल्या, गादीचा गुबगुबी आणि गुळगुळीत स्पर्श तिच्या अर्ध्या उघड्या पाठीला जाणवत आहे. पण या क्षणीं तो स्पर्श नकोसा वाटतो आहे. समुद्राच्या खुसखुशीत वाळूवर लोळावं, असं तिला वाटत आहे. समोरच्या वॉर्डरोबमध्ये तिच्या असंख्य आणि तऱ्हेच्या साड्या आहेत. त्यांतच पोहण्याचा पेहरावहि पण एक आहे. अजून कोराकरकरीत आहे. त्याचा उपयोग करण्याची संधी तिला मिळालीच नाहीं. या क्षणी मात्र त्या पेहरावांत आपण समुद्राच्या लाटावर उडी घ्यावी, लाटांशी दंगामस्ती करावी, लाटांच्या कडून अंगमर्दन करून घ्यावं असं तिच्या मनांत येत आहे. नुसतं मनांतच येत आहे. वॉर्डरोब आणि त्या शेजारचा तीन आरशांचा ड्रेसिंगटेबल यांच्याकडं ती आळीपाळीनं बघत पडली आहे. मधूनच अंगाला आळोखे पिळोखे देत आहे. आणि फिरून तशीच लोळत आहे.

दुपारीं बारा वाजतां घाईघाईनं जेवण आटोपून, त्रिभुवन फर्ममध्यें निघून गेला तेव्हांपासून ललिता याच अवस्थेंत पडली आहे. पडून पडून तिच्या पाठीखालचा भाग उबदार झाला आहे. या कृत्रिम गारव्याचा आणि खोलींत असं कोंडून घेण्याचा तिला वीट आला आहे. या हिरव्या अंधारांत तिचा जीव गुदमरला आहे. आणि तरीहि ती जागची न उठतां, केवळ अंगाला आळोखे पिळोखे देत आहे. हुळहुळत्या अंगानं ती या कुशीवरची त्या कुशीवर होत आहे.

असा बराच वेळ गेल्यावर ती ताडकन् उठून बसते. तिच्या नस नसांतून एक चीड ठसासू लागते. साडी गोळा होऊन पलंगाखाली ओघळते. बिनबाह्याच्या ब्लाऊजमधून तिचे मांसल दण्ड, आणि छातीपर्यंतचं पोट उघडं पडलेलं असतं. पण त्याची तिला खंत वाटत नसते—काय करावं तिला समजत नसतं——

—मला एकटीला घरीं टाकून त्रिभुवन दिवसभर फर्ममध्ये जाऊन बसतो. मला कां नेत नाहीं बरोबर? विचारलं तर म्हणतो, 'तुला ऑफिसांत नेलं, तर कुणाचं कामाकडं लक्ष लागणार नाहीं. सगळे टाइपिस्टस् तुझ्याकडं चोरून बघण्याच्या नादांत, वाटेल तें टाईप करून ठेवतील. आणि खरं सांगूं डियर, तुला बरोबर घेऊन गेलो नां, तर माझंहि कामाकडे बिल्कुल लक्ष राहणार नाहीं.' खोटं. साफ खोटं. एवढी माझ्या संपदेची कदर असती, एवढं कौतुक असतं, तर मला सोडून रात्र न् दिवस असा पैशामागं धांवत सुटला नसतास. म्हणे 'बंगल्यांत तुला काय कमी आहे? रेडिओ आहे, रेकॉर्ड प्लेअर आहे. कुठं फिरून यावं वाटलं तर खास तुझ्यासाठीं गाडी आहे. घरांत नोकर चाकर आहेत.

## प्रा. वसंत अ. कुंभोजकर

कसली उणीव आहे तुला घरीं?' काय सांगयचं या त्रिभुवनला. अरे सगळं रामाचं राज्य आहे. पण त्यांत 'राम' कुठाय्? या सगळ्या वैभवांत तुझ्या सहवासाचीच तेवढी उणीव आहे. तुझ्याशिवाय मला हें सारं सुनं सुनं वाटत असेल, हा विचार तुझ्या कधीच कां ध्यानांत येणार नाहीं? तुझा मनाजोगा सहवास मला कधींच कां लाभणार नाहीं? कधीं मन मोकळं बोलणं नाहीं. कधी हातांत हात घालून फिरायला जाणं नाहीं. जुहु बीचवर नाही कि मड आयलंड वर पिकनिक्ला जाणं नाहीं. मग उटी, मसुरी, काश्मीरच्या सहली तर दूरच. माझीच आते बहीण शिरीन् किती भाग्यवान आहे. तिचाहि नवरा तुझ्यासारखाच उलाढाल्या व्यापारी आहे. पण किती रसिक आहे. किती हौशी आहे. परवां केवळ शिरीनच्या हौसेसाठीं, त्यानं तिला काश्मीरला नेलं होत. दोघांनीं खूप खूप मजा केली. एकमेकांना लगटून ते शिकाऱ्यांत बसले. गळ्यांत गळा घालून ते दऱ्या टेकड्यांतून स्वच्छंद भटकले. नाहींतर तूं. जेव्हां बघावं तेव्हां आपल्या पैशाच्या गोष्टी चाललेल्या असतात. आज काय एम्नी साथे पार्टनर शिप्—उद्यां काय अमकी इस्टेट खरेदी केली—सौदो घणु सारू—ताडदेवची चाळ दुप्पट किंमतीला विकून टाकली. उद्यां मला मद्रासला गेलेंच पाहिजे. गयो अवसर पाछो न आवे—गोव्यांत नवीन मॅंगनीजची खाण ओपन करायची आहे. कर बाबा. सगळ्या उलाढाली कर. तुझ्या या लाखालाखाच्या उलाढालींत, करोडोंच्या वाटाघाटींत माझी तुला कशाला आठवण राहील ?

खरंच या घरांत मला काय किंमत आहे? जसा एक फ्रीझर आहे, रेफ्रिजेटर आहे, कळ दाबल्याबरोबर आवाज देणारा रेकॉर्ड प्लेअर आणि टेप रेकॉर्डर आहे, जसा एक व्हॉक्युम क्लीनर आणि धुलाईचं यंत्र आहे तशीच एक बायकोहि आहे, अशी त्रिभुवनची कल्पना आहे काय? आणि त्याच्या आयुष्यांतल्या सुखाच्या कल्पना तरी काय आहेत? एवढा अफाट पैसा मिळवायचा तो कशासाठीं? हा बंगला, हें ऐश्वर्य यांचा उपभोग घ्यायला तो बंगल्यावर असतो किती वेळ? आणि असल्या वेळापैकी शुद्धीवर किती वेळ असतो?

शी: कंटाळा आला. रोजच्या रोज तीच टेप वाजविल्याप्रमाणं तेच तेच विचार तरी किती करायचा? असं कोंडून किती वेळ घ्यायचं? शुद्ध वनवास आहे. वनव स? पण वनवास किती आल्हाददायक याहून. परवां शमा पारडीवालाबरोबर कुठला चित्रपट पाहिला बरं. कुठलासा इंग्रजी जंगलपटच होता. मोठा मस्त होता. आफ्रिकेच्या जंगलांत एक विमान कोसळतं. पण पायलट कसावसा वाचतो. आणि रानटी टोळीच्या तावडीत सांपडतो. त्याला बळी देण्यासाठीं एका गुहेंत कोंडून ठेवण्यांत येतं. पण त्या टोळीमधली नर्तिका त्याला पळवून नेते आणि दुसऱ्या एका टोळीत सामील होते. ते दोघं प्रेमांत पडतात. प्रेम रंगांत येतं. रोमान्स सुरू असतो. हिरव्यागार जंगलांतून खळखळ-



अनुक्रमणिका




णाऱ्या निळ्या निळ्या पाण्यांत, गळ टाकून ती नर्तिका वसलेली असते. मागून तो तगडा पायलट येतो. आपल्या पंजानी नर्तिकेचे दंड पकडतो. त्याच क्षणी गळाला मासा लागलेला असतो. पण नर्तिका गरंकन मागं वळल्यामुळें तिच्या हातां-तील गळाची काठी गळून पडते. मासा गळासकट काठी पाण्यांत ओढून घेतो. नर्तिका पायलटला आपल्या मिठीत ओढून घेते आणि...असला वनवास...

बोटांत बोटं अडकवून आणि हात उंचा-वून ललिता फिरून एकदां आळस देते. समोरच्या आरशांत दिसणारं आपलं प्रतिबिंब नर्तिकेच्या भूमिकेतील नटीपेक्षां खचितच सुंदर आहे, या विचाराने ती सुखावते, पण त्यामुळंच अधिक अस्वस्थ होऊन फिरून चिडचिडूं लागते.

काय करावं त्रिभुवन येईपर्यंत—आणि कधी येणार हा घरी? त्याला मुळीं घरीं यायची ओढच नाहीं. त्याला ओढ आहे लक्ष्मीची. तिच्या तालावर नाच नाचून थकला म्हणजे दोन घटका विश्रांती घेण्या-साठीं येईल घरी. दहा वाजतां. अकरां वाजतां, कुणी सांगावं रात्री बारा वाज-तांहि परतेल तो. आल्यावरहि त्याची बडबड चालूं असेल ती दिवसभराच्या पराक्रमाची. ती बडबड चालूं असतांनाच शँपेनची बाटली पेल्यांत खळखळेल. बर्फाचे चौकोन त्यावर तरंगतील. पेला रिकामा होईल. दिवसाचा थकवा गळून पडेल. त्या तरतरीत नशेत तो आपल्याला जवळ घेईल. केवळ शँपेनची नशा म्हणून. जणुं कर्तव्य भावनेनं. आणि गेल्या कांहीं रात्री तर कोऱ्या शँपेनची कडक नशा करून तो तसाच लोळागोळा अवस्थेंत झोपेच्या स्वाधीन झाला होता. अंधार तडफडत राहिला होता. मदिरा—प्रथम प्रथम मदिरेची ती बाटली तिला जिवलग सखी वाटायची. पण आतां ती तिची वैरीण वनली होती. वैरीण नंबर दोन. एक नंबरची वैरीण होती लक्ष्मी!

शँपेनच्या बाटल्या असलेल्या बंद कपाटाकडं, ललिता एक जळजळीत कटाक्ष टाकते. आणि मग कपाटाशेजारचं दुसरं स्टील कॅबिनेट तिची नजर आकर्षून घेते. त्या कपाटाच्या खालच्या खान्यांत टेपरेकॉर्डर असतो. आणि वरचे तिन्ही खाने निरनिराळ्या टेप्सच्या रिळांनी भरलेले असतात. संगिताचे आणि नाटकाचे चांगले चांगले कार्यक्रम टेप करून घेण्याचा ललितेला छंद असतो. रंगभूमीवर गाज-लेली नाटकंच्या नाटकं, आणि नामांकित गवयांच्या रंगलेल्या संपूर्ण मैफली तिनं टेपवर टिपून घेतलेल्या असतात. त्यापायीं हजारों रुपये तिनं उधळलेले असतात. अनेक युक्त्या प्रयुक्त्या केलेल्या असतात. हा सारा पराक्रम, तिची सारी कर्तबगारी त्या कपाटांत मांडून ठेवलेली असते. ती उठते. आणि टेप्सच्या कॅबिनेट-जवळ येऊन उभी राहते. तिला अभिमान वाटतो. भारतीय संगिताचं सारं नादब्रह्म मुकाट्यानं तिच्यापुढं उभं असतं. अनेक गवयांच्या गळ्यांतील लहरी ताना तिच्या हुकुमाची, तिनं नुसती कळ दाबायची वाट बघत असतात. अनेक नामांकित बजवय्यांची वाद्यं तिला मुजरा करून विचारत असतात, 'ललिता राणी आपली सेवा करूं?' दुनियेला तुच्छ लेख-णारे सारे कलावंत तिच्या पुढं जणु गुलाम असतात. अगदी बडे गुलाम अली खाँ सुद्धां!

कुणाला फर्माईश करावी? जितेंद्रला ? की कुमार गंधर्वाला? कुमारच्या गाण्यांत काय जादू आहे! चीज मध्यावर आली की मग त्याच्या तानांचे जे नर्तन सुरूं होतं त्यानं जीव नाचायला लागतो. पण आपण टेप करून घेतलेल्या कार्यंक्रमांतील जितेंद्रचा आवाज काय छान लागलाय्. नाही तर दोघांचहि राहूं दे. भीमसेन-लाच बसवावं गायला. इंद्रायणीं कांठीं—बस्स् या निर्दय एकांताचा विसर पडून आपलीहि समाधी लागेल. इथल्या इथं.

उत्साहानं ललिता भीमसेनाच्या टेपला हात घालते. पण झाडावरून गळून पड-णाऱ्या पानासारखा तो हात खाली येतो. असंख्य वेळां या टेप्स वाजवून त्यांचा आतां आपल्याला कंटाळा आला आहे, याची तिला जाणीव होते. केवळ आपल्या छंदाचा अभिमान म्हणून, म्हणून आपण पलंगावरून उठून कपाटापर्यंत उत्साहानं आलो, हे तिच्या ध्यानांत येतं आणि विझलेल्या चंद्रज्योतीसारखी ती परत पलंगावर पडून राहते. संगितापेक्षां कुणाच्यातरी संगतीची तिला भूक असते. काय करावं ? शमा पारडीवालाकडं जावं काय? किती वाजले? अडीच. शी:



"मला वाटतं आपली बेबी आतां चांगलीच मोठी होत चालली आहे—"

अद्याप ती घरीं आली नसेल. अजून सॅम्युअल मिल्सच्या रिसेप्शन काँटरवर ती उभी असेल. ऑफिसांत येणाऱ्या प्रत्येकाचं स्वागत करण्यासाठीं चेहऱ्यावर उसनं हास्य आणून उभी असेल. तिची ड्यूटी दुपारीं चारला संपते. पण आपण गेलों, तर आपल्यासाठीं तास दीड तास ती आधी बाहेर पडूं शकेल. जावं काय तिच्याकडं ? तिच्या संगतींत वेगळाच आनंद असतो. तशी कॅरेक्टरला ती थोडी अशी तशीच आहे. पण गप्पागोष्टीला मोठी गोड आहे. तिच्या संगतींत वेळ कसा मजेंत जातो! एकदां सिगरेट पेटवून तिनं गंमती गंमती सांगायला सुरवात केलीन्, की या रिकामटेकडेपणाचा घडी-भर विसर पडतो. आणि सिगरेट सुद्धां काय स्टायलिश् ओढते ! चला जावंच तिच्याकडं, पण नको. तिच्याकडं गेलं, की तिच्याबरोबर तिच्या घरीं जावंच लागणार. आणि तिथं तिचा भाऊ असणार—दिलीप पारडीवाला—शमाच्या आणि आपल्या गप्पा रंगात आल्या कीं नेमका तिथं येऊन दाखल होतो. गप्पांत भाग घेतो. शमा देखील त्याला एका शब्दानं जा म्हणत नाहीं. कशाला म्हणेल—दिलीपशीं मोकळेपणानं मी बोलावं, असा तीच आपल्याला सारखा आग्रह करते. स्त्रीपुरुषांनी परस्पराशीं निःसंकोच मोकळेपणानं वागणं, त्यांच्यांत स्वाभा-विक समजतात. पण आपल्याला नाहीं बाई दिलीपशीं बोलणं जमत. कां कुणास ठाऊक पण दिलीपची भीति वाटते. त्याच्या देखण्या उंच्यापुऱ्या शरीराचं, आणि त्याच्या मोहक संभाषण चातु-र्याचं आपल्याला भय वाटतं. आणि मखमाली आवाजाची तर धास्तीच वाटते. तो बोलूं लागला की त्याच्या आवा-जाला अशी एक गोड रिंग निर्माण होते, कीं जीव त्यांत अडकतोय् असं वाटतं. नकोच. त्याच्या वाटेला न गेलेलं बरं. एके काळी म्हणे तो नांवाजलेला क्रिकेट-पटु होता. आतां कुठल्याशा कॉलेजांत क्रिकेट कोच म्हणून काम करतो म्हणे. पण ही नोकरी म्हणजे आपली दाखवायची गोष्ट. त्याचा खरा धंदा वेगळाच होता. होता कां अजूनहि आहे म्हणतात. कोण सांगत होतं बरं. हो शिरीन. शिरीनच सांगत होती—'त्या—पारडीवालाचा म्हणे फोर्टमधे कुठ तरी नाईट क्लब आहे'—पण असेना मला काय करायचं आहे त्याच्याशी? नाईट क्लब असेना, नाही तर डे क्लब असेना. मी गप्पा मारायला जाते, ती शमाकडं. आपल्यांत दिलीप आला तर त्याच्याकडं आपण दुर्लक्ष केलं म्हणजे झालं. नाही तर शमालाच आपल्या गाडींत घालून घेऊन जावं दूर दूर—पण इथं पडून राहण्याचा आतां कंटाळा आलाय्.

खोलीमधला हिरवा रंग आतां अधिकच गडद झालेला असतो. त्या जंगलपटांतील झाडीच्या रंगासारखा. त्या जंगलांतून सावधगिरीनं ललिता आपली गाडी हांकत असते. समोर एक निळा अथांग जलाशय लागतो. पण ती गाडी थांबवत नाही. पाण्याच्या लाटाळ पृष्ठभागावरून गाडी अल्लाद धावूं लागते. आणि पोहण्याच्या पेहरावांतील ललिता धांवत्या गाडींतून

छानदार सूर त्या पाण्यांत मारते. पृष्ठ-भागाखालची संथ अथांग निळाई कांपीत, ती खाली, खूप खाली जाऊं लागते. सर्व बाजूंनी पडणारा पाण्याचा दाव, तिला क्षणभर हवाहवासा वाटतो. तवढ्यांत त्या पाण्यांतच एक विहीर असलेली तिच्या दृष्टीला पडते. त्या विहिरीला अन्त नसतो. ती घावरते. त्या पोकळ अंधेऱ्या विहिरीतहि आपण आतां कोसळणार या भीतीनं, ती किंचाळणार असते. इतक्यांत वरून एक त्रिकेटची बॅट सरळ रेषेंत खाली यते. आणि तिच्या समोर स्थिर होते. काय होतंय् हे ध्यानीं यायच्या आंतच, ती त्या बॅटची मूठ धरते आणि त्यासरशी बॅट वर जाऊं लागते. हलकी फुलकी झालेली ललिता एकदम वर येते. अरे पण हें काय, इथलं सरोवर काय झालं? हा तर कुठल्या तरी देवळाचा अंधेरा गाभारा आहे. या गाभाऱ्यांत ललिता बसली आहे. पोह-ण्याचा पेहरावहि अंगावर नाहीं. गाभाऱ्यां-तील मूर्तीची जागा रिकामीच असते. तसं तिला जरा वरं वाटतं. वर भली मोठी घंटा आपोआपच वाजूं लागते. एवढ्या मोठ्या घंटेचा आवाज किती लहान. घंटेच्या हलत्या लंबकाकडं ती एकटक पहात राहते. आणि मूर्तीच्या रिकाम्या जागेवरून एक भला मोठा साप तिच्या दिशेनं संथपणानं वळसे घालीत येत असतो. पण ललिता घावरत नाहीं. उलट ती त्या सापाकडं निरखून पहात राहते. आप-ल्याला सापाची भीति कशी वाटत नाही याचं तिला आश्चर्य वाटतं. तो सापहि लडिवाळपणें लचकत मुरडत तिच्या अंगावर चढणार असतो. इतक्यांत तिला कुणी तरी जोरानं मागं खेचतं. तशी ती दचकते. घावरते. पण कुणी मागं खेचलं तें मात्र तिच्या ध्यानांत येत नाहीं. आणि वरची पितळी घंटा नाजुक आवाजांत वाजतच असते. आणि घण्टेच्या लंबकाच्या जागी क्रिकेटच्या बॅटची मूठ हलत असते. घंटेवर आपटत असते. घण्टा वाजतच असते...वाजतच असते...

ललिता दचकून जागी होते. खरंच फोनची घण्टी वाजत असते. घडघडत्या उरानं ती उठते आणि फोन घेते.

'हॅलो मी ललिताच बोलतेय्.'

'हुं त्रिभुवन बोलुं छुं'

'त्रिभुवन?'

'हां हां त्रिभुवन. अग इतका वेळ गेली होतीस कुठं? मी केव्हांपासून फोन करतोय्'

'जरा डोळा लागला होता मला.'

'असूं दे. हे बघ डिअर. मी आतां तासाभरांत घरीं येतोय्. म्हणजे आतां पावणे तीन वाजलेत पावणे चारपर्यंत मी घरीं येतो.'

'थांब थांब. काय म्हणालास? पुन्हां एकदां सांग. तूं आज इतक्या लौकर घरीं येणार? माझ्या कानावर विश्वासच बसत नाहीं. फिरून एकदां सांग बरं.'

'कां ग, यांत कानांवर विश्वास न बसण्याजोगं काय आहे?'

'म्हणज आजवर जे कधीं घडलं नाहीं ते आज घडतंय् यावर माझा सहजा सहजीं विश्वास बसेल कसा? सांग ना....'

'सांगतो. सांगतो. समक्ष येऊनच सांगतो मग तर विश्वास बसेल.'

'Impossible . तूं इतक्या लौकर घरीं परतशील यावर माझा जरा सुद्धां विश्वास बसणार नाहीं. आतां तूं घेतली तर नाहीस नं? '

'डार्लिग मारा उप्पर जे तोहमत लेवानी छे, ते हुं त्या आव्या पछीज करजो ने'

'म्हणजे खरंच येणार तूं?'

'कां येऊं नको काय? '

'तसं नव्हे रे पण माझी थट्टा तर करत नाहीस? नाही तर फिरून अर्ध्या तासानं फोन करशील– Sorry dear, मारे घरे आवानु हतु पण—आणि सांगशील कांही तरी सबब.'

'अग खरंच नाहीं. विश्वास बसत नसेल तर असं कर. फोन तसाच कानाशीं धर. आणि मी गाडींत बसून गाडी स्टार्ट केल्याचा आवाज ऐक आणि मगच फोन खाली ठेव, मग तर झालं? माझं ऑफिस पोर्चला लागूनच आहे. गाडी इथून सुरू करतो तो बंगल्याच्या पोर्चमधेच थांबवितो. आणि हें बघ–पण नको समक्षांतच सांगतो तुला. '

'त्रिभुवननं, फोन टेबलावरच ठेवल्याचा टक्क् असा आवाज, ऑफिस मॅनेजरला त्यानं दिलेल्या सूचना, आणि कोणावरोबर तरी बोलत असल्याचा सूर आणि गाडी स्टार्ट झाल्याची सूक्ष्म घरघर, सगळं ललिता ऐकते. शहारते आणि फोन खालीं ठेवते. त्रिभुवनची 'किंग्ज वे' फोर्टच्या रस्त्या-वरून पळूं लागली असेल. येव्हाना तिनं काळ्या घोड्याला वळसा घातला असेल. आतां तासाच्या आंत तो आपल्या पुढ्यांत येऊन दाखल होईल.

बसल्या जागीं ललिता शहारते. त्याच्या संगतीची आपल्याला अशी तीव्रतेनं ओढ वाटायला आणि तो यायला एक गांठ पडते आहे. काय आश्चर्य आहे. क्षणापूर्वी पडलेलं तें वेडंवाकडं विचित्र स्वप्न. आपल्या भेटीच्या ओढीनं त्रिभुवन घरीं येईल, अशी सूचनाच त्या स्वप्नानं दिली होती काय? पण मग आपण विही-रीत पडत होतो म्हणजे काय? आणि ती बॅट? कांही का असेना. त्रिभुवन अर्ध्या पाऊण तासांत इथं येणार. इथं. अगदी इथं माझ्या मिठींत—

ललिता चटकन् उठते. खिडक्यावरचे जाड पडदे दूर करते. स्वच्छ प्रकाश उता-वळेपणानं खोलीभर पसरतो. ललितेला बिलगतो. अंगावरची साडी सारखी करीत ती दार उघडते. बाहेरच्या उवाऱ्याची झळ जाणवत पण ती बरी वाटते. आंतल्या कृत्रिम आणि यांत्रिक गारव्याचा कंटाळा आलेला असतो. जिन्यावर उभी राहून ती स्वयंपाकीणीला हांका मारते. सूचना देते. दारवानाला बोलावून साहेब येत असल्याची वर्दी देते. परत खोलीत येऊन

वॉर्डरोबमधली अस्मानी साडी अलगद काढून घेते. त्रिभुवनला ती फार आवडत असते. निदान तसं तो म्हणतो येवढं खरं. बाथरूममधे जाऊन ती अंगावरची वस्त्रं दूर करते. मघाचं स्वप्नहि मनावेगळं करण्याचा प्रयत्न करते. आणि स्वच्छ स्नान करून, घासून घासून आपली गोरी काया गुलाबी झालेली पाहते. सर्वांगावर पावडर फवरतांना उत्साहानं तिच्या शरीराचा कणन् कण नाचत असतो. अस्मानी साडी नेसून ती ड्रेसिंग टेबल समोर येते. मघाशी हिरव्या अंधुक प्रकाशांत पाहिलं त्यापेक्षां, स्वतःचं प्रतिबिंब आतां लाखपटींनं सुंदर दिसतं. मनाजोगी केशभूषा व्हायला, नाही नाही म्हटलं तरी पंधरा मिनिटं लागतात. आतां फक्त अर्धा तास राहिला. तोंडावर फिरून एक हात फिरवीत ती पावडरचा थर सारखा करते. ओप्टशलाका फिरविण्याची जरुरी नसते. तिचे ओठ मुळचेच लाल चुटुक असतात. आणि आतां तर फक्त सेंटचा एक फवारा साडीवर आणि छातीवर उडवून घत. व्हरांड्यांत येऊन उभी राहत. समोरची भगभगीत बाग एकदम सप्तरंगांत फुलून आल्याचा तिला भास होतो. फुलांचे ताटवे झुलूं लागतात आणि बागेश्रीच्या सुरावटीवर ती डोलूं लागते. कोरड्या कारंज्यांतून सहस्त्र धारा उसळूं लागतात. तिच्या नसानसांतून उसळणारी धग कारंजाच्या नृत्याशीं लय साधते.

त्रिभुवन आपल्या भेटीच्या ओढीनं, आज प्रथमच घरी येत आहे. पण खरंच आपल्या भेटीसाठींच तो येत असेल काय? की...या दुसऱ्या विचाराला मनांत फार वेळ थारा मिळत नाहीं. संगमोत्सुक सारिकेसारखी, अभिसारिकेसारखी तो त्रिभुवनची वाट बघत असते. बाहेरच्या व्याकूळ उन्हाकडं निरखून पाहात ती उभी असते. पण खरं म्हणजे ती उभी नसतेच. वाऱ्याची लहर होऊन त्रिभुवनच्या येण्याच्या मार्गावर भिरभिरत निघालेली असते. आणि भोंवताली सगळं चांदणंच चांदणं सांडलेलं असतं.

अखेर त्रिभुवनची पसरट गाडी, फाटकांतून आंत येते. कारंजाच्या पुष्करणीला वळसा घालते. आणि व्हरांड्याच्या पायरीला भिडून एक झोला खात उभी राहते. ललिता डोकावून पाहते. आणि आणि तिची निराशा होते. वाऱ्याची लहर गुदमरते. बगीचा फिरून भगभगूं लागतो. त्रिभुवनबरोबर आणखी कोणी तरी आलेलं असतं. तंग इस्त्रीचे पांढरे शुभ्र कपडे घातलेला, तो बेडौल अंगाचा शेटजी त्रिभुवनच्या मागोमाग खाली उतरतो. त्रिभुवनवर झडप घालायचीं, त्याला गुदमरून टाकायची तिची स्वप्नं खळकन् फुटून जातात. त्रिभुवन त्या व्यापाऱ्याशी तिची ओळख करून देत असतो. पण तिचं लक्ष नसतं. आपल्या शिक्षणाची तो तारीफ करीत असलेलं ऐकून देखील तिला आनंद होत नाही. आणि तिची उरली सुरली चिवट आशाहि तिथून नाहीशी करून टाकतो. तो सांगत असतो.

'एम्नी साथ पार्टनर शिप्मा एक अमेरिकन कंपनीनी मारे होलसेल एजन्सी लेवानी छे. अने ते माटेच अमे आज कलकत्ता जइए छिये'

'ललिता कांहीच बोलत नसते. तिची बुद्धं बधीर झालेली असतात. त्रिभुवनच गडबडीनं पुढं बोलत असतो.

'तिकीट रिझर्व्ह करून आलोय् आम्हीं. बरोबर पांच पन्नासला विमान सुटतं. म्हणजे एक तासाभरांत आम्हाला सान्ताक्रूजवर हजर राहायला पाहिजे. सुखियाला सांगून तेवढी झटकन् माझी बॅग भरून घे बघु'

तेवढ्यांत कॉफीचे आणि फराळाचे ट्रे मांडलेलं चकचकतं फिरतं टेबल ढकलीत सुखीया दिवाणखान्यांत येतो. ललिता ते ओढून मध्यावर घेते. टिपॉयवरचा रिकामा फ्लॉवर पॉट सुखीयाच्या हातीं देत, कॉफीचे कप टीपॉयवर मांडते. बिस्किटाच्या बशा ठेवते. हे सर्व करीत असतांना तिचा हात विलक्षण थरथरत असतो.

'तुला बरं नाहीं काय?' असं त्रिभुवन तिला विचारतो, तरी ती स्वस्थच राहते. किल्ली संपत आलेल्या यंत्रागत ती कपांतील साखर चमच्यानं ढवळीत असते. त्या ढोबळ आणि गांठ व्यापाऱ्याबरोबर त्रिभुवनचं बोलणं चालूंच असतं. कॉफीचा कप अर्धाच ठेवून ललिता उठते आणि आपल्या खोलीकडं जायला निघते. जिन्याच्या टोकाशीं आल्यावर त्रिभुवनला ती हांक मारते आणि आपल्या खोलींत येऊन त्याची वाट पहात बसून राहते. पण खाली त्या दोन लक्ष्मी पुत्राची बोलणी ऐन रंगांत आलेली असतात. तिला त्यांची ती चर्चा ऐकणं असह्य होते. फिरून आवाज चढवून ती त्रिभुवनला हांक मारते. तरीहि ती त्याला ऐकूं जात नाहीं. कांहीं विचारण्यासाठी सुखिया तिच्या खोलीच्या दाराशीं उभा असतो त्याला ती सांगते.

'शेट को बोलो, मैं बुलाती हुं'

'त्रिभुवन वर येतो पण त्याच्या कपाळाला आंठ्या असतात. त्या आंठ्या पाहून ललितेला, तो त्या गांठाळ व्यापाऱ्या इतकाच ओंगळ वाटतो. तिच्या उसळत्या वासना मरगळून जातात. ती पलंगावर पडून राहते. त्रिभुवन तिच्या कपाळावर हात ठेवत म्हणतो—

'तुला बरं नव्हतं तर खालीं कशाला आलीस. पण कांहीं विशेष दिसत नाहीं. थोडं गरम झालंय् अंग.'

त्रिभुवनच्या थंड हाताच्या स्पर्शानं तिला त्याची शिसारीच येते. ती कांहीच बोलत नाही हें पाहून त्रिभुवन पुढं म्हणतो,

'हे बघ मी तीन चार दिवसापेक्षां जास्त राहात नाही कलकत्त्यांत. तुझी प्रकृती बरी नाही म्हणून मी जाण्याचा बेत कॅन्सल केला असता. पण असल्या किरकोळ दुखण्यासाठीं एवढा मोठा सौदा, मी हातचा घालविला तर आमची व्यापारी दुनिया मूर्खांत काढेल मला. गयो अवसर पाछो न आवे. तूं काळजी करूं नको. जरूर वाटली तर डॉ. पैना फोन कर. पण तसं काही विशेष दिसत नाहीं. you will be all right by tomorrow. बरं मी उठतो. विमान गाठलं पाहिजे. हुं जाईने आवु छे. Take rest.

कुणा तरी तिऱ्हाईत इसमाच्या समाचाराला गेल्यागत, त्रिभुवन तिचा निरोप घेतो. ललिता त्याच्याकडं वळूनहि बघत नाही. जिना उतरल्याचा आवाज ती ऐकते. थोड्या वेळानं गाडी सुरू झाल्याचा आणि फाटक लावून घेतल्याचा आवाजहि तिच्या कानीं येतो. पण ती जागची उठत नाही. फिरून शांत झालेल्या बंगल्यांत संगमरवरी स्तब्धता गोठून राहते. आणि अचानक मघांचा तो चमत्कारिक घंटानाद तिच्या मस्तकांत निनादूं लागतो. लंबकाच्या जागीं त्रिकेटची मूठ असलेल्या घंटेचा आवाज!

ती तिरीमिरीसरशीं उठते. फोनची नळी कानाशीं लावून तबकडी फिरविते.

'हॅलो, मी ललिता बोलत आहे. शम आली नाही अजून? मग बोलतंय कोण? दिलीप? very good दिलीप मला तुझ्याशींच बोलायचे होतं....'

●●●







लेखक : चार्लस् शॉ

अनु : प्र. श्री. नेरुरकर

# मानवी प्रज्ञा आणि प्रयत्न 'चमत्कार' घडवूं शकतात

देवाला डोळे असतात

**पूर्व कथासूत्र –**

**पॅसिफिकमध्यें एका तराफ्यांतून पाण्यांत फेंकला गेलेला हेन्री ॲलिसन हा अमेरिकन नौदल सैनिक दैवयोगानें एका निर्जन बेटावर येऊन पडतो. सकाळ उजाडल्यावर तो बेटावर सर्वदूर भटकतो. त्याला एका प्रार्थनामंदिराच्या पायरीवर एक जोगीण दिसते. माणूस भेटल्याचा आनंद त्याला होतो दोघें एकमेकांची कथा सांगतात. तिची माणसेंही तिला भेटतील अशी आशा मावळलेली असते. आणि तो त्याच्या गटांतला एकमेव वांचलेला माणूस होता.**

**— सबंध बेटावर दोनच माणसें आहोंत हें सत्य स्वीकारून पुढें जायला हवें असा निर्णय ते घेतात.**

## [५]

### पलायन

**मग** त्यांच्या वाटचाला जे दिवस आले, त्यांत तो नाविक व ती जोगीण त्या विचित्र परिस्थितींत कसं जगायचं तें शिकूं लागली. युद्ध सुरू होण्यापूर्वी फिलिपिन्समध्यें दहा आणि जास्त आठवडे नोकरी केलेली असल्यामुळें, ॲलिसन हा जंगलच्या जीवनाबद्दल अधिक अनुभवी होता. त्याला सैनिकी शिक्षण मिळालं होतं. स्वभावतःच तो व्यवहारी, स्वतंत्र आणि आनंदी होता आणि भविष्याबद्दल फिकीर करीत बसण्याची त्याला संवय नव्हती. या कारणांमुळे तो लवकरच पुढारी बनला—त्या जोडीपैकीं अधिक बलवान सभासद ठरला. अर्थातच त्याची लिंग विभिन्नता हेंच अत्यंत महत्वाचें कारण होतें.

ॲलिसन एक पुरुष होता ह्या वास्तवतेचं सिस्टर ॲंजेलाला काहीं महत्व वाटत नव्हतं. तिची श्रद्धा, धार्मिक शिक्षण घेण्यांत गेलेली तिची वर्षें, तिचे तिच्या जीवनाबद्दलचे उच्च हेतु, या सर्वांमुळे ती पार्थिवतेच्या वर व पलिकडे गेली होती. ती आपल्या लिंग-प्रवृत्तीच्या पलिकडे गेलेली होती. याअर्थीं ॲलिसनला ती काम-पीडा विरहीत वाटली होती. त्याच्या दृष्टीने ती एक जिवंत वस्तू होती कीं जी खात होती, पीत होती, आणि झोपत होती आणि तिचें संरक्षण होणें जरूर होतें. दुसऱ्या दृष्टीनें, ती म्हणजे एक संपूर्ण गूढ होतं.

त्या जोगीणीच्या प्रार्थना, तिचे विचार, जीवन पद्धती—या सर्व गोष्टी त्याला पवित्र आणि आकलनाला अशक्य वाटत होत्या. तो बहुधा कधींच त्यांच्याबद्दल बोलत नसे. ती स्वतः क्वचितच् आपल्या श्रद्धाभावविषयी बोले. किंवा त्याच्या भावनांविषयी उत्सुक दिसे. म्हणून, एकमेकांबद्दल आदर बाळगीत त्यांनी त्या बेटावर आपल्या जीवनाला प्रारंभ केला.

त्यांच्या बेटावर विपुल पाणी होतं आणि अत्यल्प असं अन्न होतं, विशेषतः फळें. तें अरण्य मांसाहारासाठीं उपयोगी पडतील अशा जनावरांनीं व पक्ष्यांनीं भरून गेलं होतं, परंतु शिजविण्यासाठीं आग तयार करण्याची सोय तेथें नव्हती. याच कारणास्तव त्यांना मासे पकडण्याचे प्रयत्न करण्याची इच्छा नव्हती.

त्यांना आढळून आलं कीं तें बेट सुमारे मैलभर रुंद व तीन मैल लांब होतं—उत्तरेकडून दक्षिणेकडे, आणि त्याच्या वायव्येकडील कोपऱ्यांत पुष्कळ टेकड्या होत्या. जी जागा त्यांना सर्वांत अधिक आवडली ती होती पूर्वेकडील एक छानदार टेकडी. त्या टेकडीच्या पायथ्याला वालुकामय समुद्र स्थळें होती आणि रुंद, रमणीय उपसागर होता कीं जिथें ती तर होती आणि वसाहत होती व पूर्वी तिथें लोक जीवन कंठीत होते.

सिस्टर ॲंजेलानं निर्देशिलेलं खेडं एके दिवशीं ॲलिसननें शोधून काढलं. तिथें काहींही मौलिक वा उपयुक्त असं न सापडल्यामुळें

त्यानें तर्क केला कीं बॉंब वर्षावानंतर कुणीतरी तिथें परतला होता, जें घेण्यासारखं होतं तें सर्व त्यानें घेतलं होतं आणि मग समुद्रमार्गे पलायन केलं होतं. अशी ही असामी कुठें गेली असेल याचं आश्चर्य करीत तो किनाऱ्यावर उभा राहिला. बोर्निओला ? जावाला ? ऑस्ट्रेलियाला? नकाशाचं कांहींच ज्ञान नसल्यामुळें आणि ज्यावर तो उभा होता त्या बेटाचें पण नांव त्याला ठाऊक नसल्यामुळें, त्याला कांहींच तर्क करतां येईना.

सुमारें एक आठवड्यानंतर, सिस्टर अँजेलाला मंदिरांत ठेऊन तो त्या छोट्या नदींत आंघोळीसाठीं गेला. तो पाण्यांत होता आणि तेथें त्याला हालचाल न करतां रहावं लागलं होतं; इतक्यांत त्या झाडांच्या किंचित् वरून तीन विमाने उडत आली. ती निघून गेल्यावर, त्यानें पाण्याबाहेर उडी मारली आणि झाडींत जाऊन कपडे अंगावर घातले. परंतु तेथें त्याला वीस किंवा अधिक मिनिटें दडून रहावं लागलं होतं. ती विमानें परतली होती व त्याच्या डोक्यावर गरगरत होती.

तो मंदिरांत आला तेव्हां सिस्टर अँजेलाचे डोळे त्याला प्रश्नोत्सुक दिसले.

"जपानी विमानें" तो म्हणाला, "मला नाहीं आवडत तें. ती कशाचा तरी शोध करीत होती. त्याबद्दल तूं खात्री बाळग. तीं परत मागे येणार".

सिस्टर अँजेला पायऱ्या उतरून खाली आली आणि त्याच्याजवळ बसली. विचारपूर्वक स्वरांत तिने विचारले, "जास्तीत जास्त चांगलं काय करतां येईल?"

"कांहीं करतां येईल असं फारसं कांहीं दिसत नाहीं. पण सिस्टर, एक गोष्ट नक्की आहे. या मंदिरांत आतां आपण राहूं शकत नाहीं. या बेटावर कुणीतरी रहातं हें त्यांना आपण पाहूं देतां नये. त्यांना जर तसं वाटलं तर आम्हांला हुडकून काढीपर्यंत ते आपला तपास करीत राहतील. सिस्टर, आम्हांला गेलंच पाहिजे, आणि तिकडे कुठेंतरी त्या टेकड्यांत जाऊन राहिलं पाहिजे. त्या तिकडे झाडावेलींनीं आच्छादिलेल्या जमिनींत आपल्याला कांहीं खड्डे खणले पाहिजेत. आणि या चर्चमध्यें कुणी रहात होतं याबद्दलची प्रत्येक खूण आपल्याला पुसून टाकली पाहिजे. तें कांहीं इतकं चांगलं होणार नाहीं, सिस्टर, पण तेवढीच एक संधि आपल्याला प्राप्त होते आहे."

"पण कांहीं झालं तरी, ते इथें आल्यावर या बेटावर शोध करणार नाहींत काय? जरीं मंदिरांत कांहीं नसलं तरी—"

"कुणाला ठाऊक; कदाचित् ते सगळं बेट धुंडाळतील; कदाचित तसं करणार पण नाहींत. जर ते मुक्कामाला आले. आणि कांहीं माणसं त्यांनी इथें ठेवली, मग मात्र आपली परिस्थिती चांगलीच बिकट होणार आहे. परंतु या बेटावर जर फक्त कांहीं माणसेंच देखभालीसाठीं ठेवतील, आणि त्यांना कांहीं वा कुणी सांपडलं नाहीं, तर शक्य आहे कीं यावर माणसें ठेवण्याइतकं हें बेट महत्वाचं नाहीं असा ते विचार करतील. ही एक फक्त आशा आहे सिस्टर, परंतु तेवढीच एक आपल्याजवळ बाळगण्यासारखी आशा आहे."

"मला कळतं," ती जोगीण म्हणाली, "तुला हवं तें व जर तें उत्कृष्ट असलं तर मी तें करीन."

"तें उत्कृष्ट असेल कीं कसं तें मला ठाऊक नाहीं. तो एक संभव आहे, एवढंच. पण आलेली कोणतीच संधि आपल्याला अव्हेरतां येणार नाहीं. अधिक आपल्या वांटचाला येणार नाहीं.

आपलं वाक्य संपवून तो उभा राहिला व म्हणाला, "निघूंया."

त्या पुलावरून व त्या टेकडीवरून त्याच्या मागून जातांना सिस्टर अँजेलानं पाहिलं कीं त्यांच्यांत बदल झाला आहे, नवी उमेद व शक्ति त्याला प्राप्त झाली आहे. त्या कडक उन्हांतही तो इतक्या वेगानें चालला होता कीं त्या लांब सैल अशा तिच्या धार्मिक संप्रदायाच्या झग्यांत, त्याच्या मागून जाणं तिला कष्टाचं वाटत होतं. तरी पण ती कांहीं बोलली नाहीं; ती फक्त त्याच्या मागून घाईनें चालत राहिली, कधीं एका टेकडीच्या बाजूने व वरून चालत, तर दुसरीची उतरंड उतरीत.

जेव्हां त्यांनीं टेकड्या चढल्या होत्या व उतरल्या होत्या आणि त्यांना तासामागून तास गेल्यासारखे वाटत होते अशा वेळीं त्यानें एका टेकडीच्या बाजूनें कधीं इकडून तर कधीं तिकडून वळायला सुरुवात केली. मग एका छोट्या व सपाट अशा गवताळ जागेवर तो थबकला आणि त्याने आपल्या सभोंवार पाहिलें. सिस्टर अँजेला इतकी कांहीं दमून भागून गेली होती कीं प्रश्न विचार-

ण्याची ताकद तिच्यांत उरली नव्हती. एका झाडाच्या छायेंत जोराने श्वास टाकीत व श्वास घेत ती खाली बसली आणि आपला लांबाडा परकर आपल्या पायांभोंवती घट्ट लपेटून घेत ती कृमी कीटकांना स्वतःपासून दूर ठेवू लागली.

"मला वाटतं कोणत्याहि चांगल्या जागेइतकीच ही पण आहे." तो म्हणाला, "आज रात्रीं आपण मंदिरांत राहण्याचा प्रयत्न करूं आणि सकाळीं लवकर येथें येऊं. माझ्याजवळ हत्यारें नाहींत. परंतु कशीतरी आसऱ्याची एखादी जागा मी तयार करीन अस मला वाटत."

सिस्टर अँजेलानं भोंवतालच्या रा टो व अपरिचित अशा जागेकड पाहिलं. आणि क्षणभर तिचा धीर गळला. त्या मंदिराचा आसरा दरिद्री होता हें खरं, परंतु पूर्वपरिचित अशा तिच्या भूतकाळाची तो तिला आठव देत होता. कसं कां होईना पण तिची अशी भावना होत गेली कीं जोंवर तें मंदिर तिथ होतं, जोंवर ती त्या मंदिरांत होती, तिचं रक्षण होणं शक्य होतं. आतां आपल्याभ वतीं त्या जंगलाकडे पहातांना—कीं ज्याला झाडांच्या भिंतीना दुसऱ्या भिंती नव्हत्या—त्या क्षणाला तरी, येथें पण परमेश्वर तितकाच प्रबळ असूं शकेल, यावर तिचा विश्वास बसेना. तिला आपल्या अश्रूंना आवर घालणें जमेना आणि ती अॅलिसनपासून दूर वळली व तिने आपलं तोंड हातांत खुपसलं—प्रार्थना करण्याचं सुद्धां सामर्थ्य तिच्यांत नव्हतं.

तिच्या वरच्या बाजूला अॅलिसन उभा होता, काय तें अचूक न उमगतांच तिच्या दुःखाचा वांटेकरी होत; स्पर्शाने किंवा शब्दानें तिचं समाधान करण्यास असमर्थ असा; कारण दोन्ही उपाय चुकीचे आहेत हें तो समजून होता.

झाडांतून त्यानें समुद्राकडे पाहिलं; निराश भावनेनें त्याचं हृदय जड झालं होतं. तिनें आपल्या दुःखावर व भितीवर तावा मिळवीपर्यंत तो थांबला. मग तो तिच्याकडे वळला आणि अनिश्चितपणें त्यानें विचारलं, "सिस्टर, हें फारच असह्य होतं कां तुला? कदाचित तेंच अधिक चांगलं होईल कीं तूं त्यांना तुला नेऊं द्यावंस. ते तुला आदरानें वागवतील—त्यांनीं वागवलं पाहिजे—कदाचित तेंच अधिक चांगलं होईल नाहीं कां?"

आपल्या झग्याच्या तळटोकानें तिनें आपले डोळे पुसले आणि गंभीरपणें तिनें त्याच्याकडे पाहिलं. "मी तुझ्याबरोबर राहीन," ती निर्धारयुक्त, पण हळू आवाजांत म्हणाली. "मी माझा धीर सोडला याबद्दल क्षमा कर. कदाचित मी फार दमलें आहे." ती उठली. "कृपया आपण माग परतूंया."

तो हलला नाहीं परंतु दूरवर समुद्राकडे विचारपूर्वक पहात तो तिथेंच उभा राहिला. मग तो म्हणाला, "त्या तीन विमानांची मला काळजी वाटते. ती नक्कीच कांहींतरी शोधीत होती. नक्कीच त्यांनी मंदिर व उपसागरावरील इमारती पाहिल्या आहेत." तो थांबला. मग त्याच्या मुद्रेवरील शंका निघून गेलेली तिने पाहिली. काय करायचं याचा त्यानें निर्णय घेतला होता

"मला वाटत तें मंदिर कांहीं आतां सुरक्षित नाहीं, सिस्टर," तो म्हणाला. त्यांनीं तें अतराळांतून पाहिल्या क्षणापासूनच तें सुरक्षित नाहीं. मला इथं राहायचं आहे. मी खाली उतरून त्या तिकडे जाणार आहे आणि आम्ही कधीं काळी तिथें होतो त्या सर्व खुणा मी बुजवून टाकणार आहे. तूं अगदी थेट इथेंच रहा." त्याच्या बोलण्याचा स्वर हुकुमी होता. ती धिक्कारपूर्वक त्याला बोलण्यापूर्वीच त्यानं ती टेकडी उतरून जायला प्रारभ केला होता.

प्रार्थनेंत ओठ हालवीत ती सांवलीत बसली. हळूहळू तिची मुद्रा कमी चिंतायुक्त दिसूं लागली—अधिक शांत दिसली. जवळ जवळ तीं निद्रामग्न झाली.

लवकरच अॅलिसन परतला. त्यानें बिस्किटाचा डबा आणला होता—आतां तो रिकामा होता—आणि दोन बाडगे त्यानें मंदिरांतून आणले होते आणि त्याला सांपडलेले कांहीं दोरांचे व राजूचे तुकडे. ते त्यानें जमिनीवर जोगीणीजवळ ठेवले. मग अल्प विश्रांतीसाठी तो खाली पडून राहिला.

अर्ध्या तासानंतर, तिला तिथेंच थांबण्याचा हुकूम करीत, तो खाली त्या उपसागराजवळील ठाण्यावर गेला. तेथें, फक्त आपली मोडकी सुरी हत्यार म्हणून वापरीत व जलद काम करीत कांहीं लाकडी पेट्या त्यानें तोडून अलग केल्या. आणि फळ्या जंगलांत थोड्या अंतरावर वाहून नेल्या. नंतर कांहीं रिकाम्या डबड्यांची त्यानं भर घातली; एका जुन्या मालवाहू गाडीच्या चाकांतील धातूचे तुकडे, एका जुन्या डेकवरील खुर्चीच जाडजूड कापड, आणि त्याला मिळालेले सर्व जुने कागद हे पण त्याने भरीला घातले. त्या सगळ्या ढिगांत राखून ठेवण्यासारखं कांहींच दिसत नव्हतं, परंतु कुणीतरी फार मोठी योजना आंखीत आहे अशी त्याची वागणूक होती. नंतर तो त्या बंगल्याच्या छपरावर चढला आणि बागेंतील जुनाट हत्याराने त्याने लोखंडी पत्र्याचे बरेच तुकडे निखळून काढले. यांचं त्याने त्या जंगलांतील ढिगांत भर घातली. नंतर दृष्टीपासून तो ढीग लपलेला आहे याचं समाधान मानीत, आणि थकवा वाटल्यामुळें, तो जोगीण होती तिथें परत आला.

तो सिस्टर अँजेलाकडे आला तेव्हां अंधार झालाच होता. कांहीं न बोलतां तो जमिनीवर पडून राहिल. थकलेला. आणि बहुधा लगेच झोपी गेला. त्या जोगीणीनें कांहीं काळ त्याला निरखून पाहिलं; तिच्या डोळ्यांत चिंता होती. मग तिने एक बाडगा घेतला आणि खाली या छोट्या नदीवर ती गेली. तिनें आपलं तोंड व हात धुतले; मग तिने जलप्राशन केलं, नंतर तो बाडगा भरला आणि त्या झोपी गेलेल्या नाविकापर्यंत तिने तो वाहून आणला. दिवसाचं रात्रीच्या काळ्या गडद काळोखांत रुपांतर होईपर्यंत ती त्याच्याजवळ थांबली.

तो जागा झाला व उठून बसला. सभोंवतालच्या झाडांनी एक काळी भिंत तयार केली होती, जिच्यांतून जनावरांचे आवाज कानावर पडत होते. स्वच्छ आकाशांत तारका होत्या, परंतु

कॅल्शियमयुक्त

# बिटको ग्राइप

नेहमीं दिल्यानें
लहान मुलें सशक्त, बांधेसूद
व गुटगुटीत होतात.

BYTCO-GRIPE
बिटको-ग्राईप
BYTCO CHEMICAL

# बिटको

काळी

## टूथ पावडर

नेहमीं वापरल्यानें
दांत मोत्यासारखे स्वच्छ
व चकचकीत होतात

Bytco
BLACK
TOOTH POWDER
CLEANS THE TEETH PEARL WHITE
BYTCO CHEMICAL INDUSTRIES

बिटको केमिकल इन्डस्टीज, नासिक-रोड.









त्या तेजस्वी वाटत नव्हत्या. सिस्टर अँजेलानें तो वाडगा ॲलिसनच्या हातांत दिला आणि संपेपर्यंत त्याने तो घटाघटा पिऊन टाकला. त्याने उसासा टाकला; मग हळु स्वरांत म्हणाला, 'फळं आणि भाज्या कांहीं माणसाला फारशी ताकद देत नाहींत. छानसा एखादा मांसखंड चघळायला मिळेल तर मी सर्व कांहीं देईन".

"तूं काय करीत होतास?" तिने विचारले. "इतका वेळ तूं दूर तिकडेच होतास."

"मी उद्योगांत होतो, फारच उशीर होण्यापूर्वी, खालून त्या तिकडून कांहीं वस्तू मिळवणं मला प्राप्त होतं. सिस्टर, आपल्याला जर इथं रहायचं असेल तर आपल्याला आश्रयस्थान मिळवलं पाहिजे. आणि—"

तो थांबला आणि उडी मारून पायावर उभा राहिला. त्याचं डोकं वर होतं आणि गप्प राहण्याबद्दल त्याने हात उगारला होता. तिने यंत्राची पहिली घरघर ऐकतांक्षणीच तो ओरडला, "मी ओळखलंच! मला ठाऊक होतं? आलीच ती आतां इथे."

तो नौदल सैनिक आणि ती जोगीण स्तब्धतेने एकमेकाजवळ उभी राहिली; वायव्येकडून येणाऱ्या इंजिनांची घरघर ऐकत. मग ती घरघर त्यांच्या डोक्यावर आणि सभोंवार येऊं लागली आणि पांढरा चकचकीत प्रकाश त्या रात्रींत वर उंच उमटला. खाली हळुहळु तरंगूं लागला. कुठेंतरी त्या प्रकाशावर, त्यावरील घरघरणाऱ्या काळोखांत, एक कर्कश किंचाळणं सुरूं झालं. मग त्या छोटया मंदिराच्या दरींत खाली बाँब गोळ्यांचे स्फोट होऊं लागले. क्षणांतच तांबड्या व हिरव्या प्रकाशाने व अग्निवलयांनी आकाश भरून गेलं.

त्याच वेळीं त्यांच्या डावीकडे दूर उपसागरावरील त्या ठाण्यावर अधिक बाँबगोळ्यांचा स्फोट झाला.

तिचा इवलासा क्रॉस तिच्या हातांत होता आणि तिच्या डोळ्यांतून गालांवर घळघळा अश्रू वहात होते परंतु ते तो पाहूं शकला नाहीं. बाँबवर्षाव थांबला तेव्हां जंगल चिडीचूप झालं. . . धक्क्याने निस्तब्ध झालं होतं. आपण इथं आहोत हें शत्रूला कळलं होतं आणि तो बॉम्बवर्षाव हा वैयक्तिक हल्ला होता ही भावना त्या नाविकाच्या व जोगीणीच्या मनांतून जाईना. त्यांना वाटलं कीं ती रात्र आणि तें आकाश त्यांच्या शत्रूनें भरून गेलं आहे आणि त्यांना जमीनदोस्त करण्यासाठीं लक्षपूर्वक वाट पहात आहे.

ॲलिसननें स्वतःला सावरलं व मन ताळ्यावर आणलं. त्याची सोबतीण कांहीं पुटपुटतांना त्याला ऐकूं आलं.

"काय म्हणालीस?" त्यानें विचारलं.

"मी प्रार्थना करीत आहे". ती उत्तरली

"मग प्रार्थनाच करीत रहा!" आडदांडपणें तो म्हणाला; कारण प्रार्थनेच्या उपयुक्ततेवर त्याचा विश्वास नव्हता. "ते मागे परत येतील. नक्कीच ते परत मागे येतील."

त्या रात्रीं आणखी दोनदां ते परत मागे आले. शेवटच्या वेळीं ते जास्तीत जास्त विमानदल व अधिकाधिक अजस्र बाँब घेऊन आले.

## [६]

## दरींत आग

**दुसऱ्याच** दिवशीं सकाळीं जपानी लोक बेटावर येऊन उतरतील अशी अटकळ ॲलिसनने केली होती. त्या जोगीणीला घेऊन तो जंगलांत खोल गर्द जागीं गेला व तिथें तिला त्यानें लपवून ठेवलें; मग उजाडतांच त्यांना टेहळण्यासाठीं तो गेला. परंतु त्या सकाळीं कांहींच घडलें नाहीं. माध्यान्हीला त्यानं ठरवलं कीं ते येत नाहींत आणि तो माघारीं त्या जोगीणीकडे गेला. "असंही असेल कीं त्यांना दुसरा उद्योग लागला असेल," तो म्हणाला, "कदाचित ते उद्यां येतील. आपल्याला जलद काम केलंच पाहिजे."

जिथून ती समुद्र व आकाश निरखूं शकत होती अशा त्या टेकडीच्या एका बाजूला त्याने त्या जोगीणीला उभी केली. मग आपल्या खड्डयासाठीं हवं तें सामान टेकडीवरून निवडलेल्या ठिकाणाकडे न्यायला त्याने सुरुवात केली. त्या जोगीणीला त्याला मदत करण्याची इच्छा होती, परंतु तिने निरीक्षण करीत राहिलंच पाहिजे, असें म्हणून त्याने ती नाकारली. आपल्या धार्मिक व्यवसायाच्या भूतकालीन जीवनांत तिने याहीपेक्षां कांहींशा जड वस्तूंची पुष्कळ ने-आण केली होती, परंतु ॲलिसनला तें ठाऊक नव्हतं. जरीं त्याला तें ठाऊक झालं असतं तरी त्याने एखाद्या स्त्रीला अशा प्रकारचं काम करूं दिलं नसतं.

दुपारपर्यंत त्याने सर्व वस्तू टेकडीवर वाहून नेल्या होत्या. कांहीं थोडी मिनिटें त्याने विश्रांती घेतली. मग जोगीणीला तिथेंच थांबवला ठेवून, एखादा पक्षी किंवा जनावर मारण्याच्या व बाँबगोळ्याच्या जळणाऱ्या आगीवर तो शिजविण्याच्या कल्पनेने तो अरण्यांत गेला. काळोखापूर्वी किंचित् अगोदर हात हालवीत तो परत आला. मांसाऐवजी पुनः त्यांनी रानटी रोप खाल्ले.

तो म्हणाला, "आपल्याला लपून राहण्यासाठीं उद्यां मी एक जागा खणून काढीन. आतां फारच काळोख झाला आहे. उद्यां रात्रीं पुन्हां आपल्याला उघड्यावरच झोपावं लागेल, सिस्टर."

ती स्तब्ध होती. जिथे तो आपली पाठ झाडाला टेकून बसला होता तिथून तिचा पांढरा शिरपरिवेष त्या काळोखांतून त्याला क्वचितच दिसूं शकत होता. त्याला वाटलं कीं ती प्रार्थना करीत असावी, म्हणून तो बोलला नाहीं.

विचार करणें अशक्य इतका विलक्षण थकलेला असा ॲलिसन, बहुतेक झोपी गेला होता, इतक्यांत ती जोगीण आपल्या जवळ येऊन बसली आहे असं त्याला वाटलं.

"तूं निश्चित दमला भागला आहेस." ती म्हणाली.

"मला वाटतं तसं." त्याने जांभई दिली व पुढें म्हणाला, "ते आज या बेटावर कां उतरले नाहींत तें मला कळेनासं झालं आहे. कुणी त्यांना अडथळा केला असावा याचं मला नवल वाटतं."




त्याला प्रत्युत्तराची अपेक्षा नव्हती हें तिनं जाणलं, म्हणून उत्तर देण्याचे कष्ट तिनें घेतले नाहींत. त्याऐवजीं कांहींशा खिन्नपणें ती म्हणाली. "रात्रीच्या वेळीं इकडे किती शांत आहे. आपण युद्ध कालांत आहों आणि मित्रांपासून इतके दूर आहों हें शक्य वाटत नाहीं."

ॲलिसननें क्वचितच तिचं बोलणं ऐकलं असेल. एक रानटी, नकोसा, चवताळून टाकणारा विचार त्याच्या मनांतून सळसळत गेला. आपलं रक्त उसळत आहे असं त्याला वाटलं. त्याच्या घशाला वाहेरून कोरड पडली. त्याच्या धडधडणाऱ्या हृदयाची त्याला जाणीव झाली. तीं दोघे एकत्र त्या काळोखांत एकटी होती. मैलोगणती त्यांच्या खेरीज आसमंतांत कुणी नव्हतं. ती एक स्त्री होती आणि तरुण अशी.

त्या विचाराच्या धक्क्यानें आणि भीतीने त्याने जोराने श्वासोच्छ्वास घेतला. झटकन स्वतःला झटकून तो दोन पायावर उभा राहीला. त्या विचारापासून मनाला सक्तीने परावृत्त करीत—त्या विचाराबद्दल स्वतःचा तिरस्कार करीत; कारण ती एक पवित्र जोगीण होती; परंतु अजूनही त्याला नवल वाटत होतं. . .सारखं नवल वाटत होतं. स्वतःशींच झगडत, स्वतःच्या मनाला शांत करीत तो झाडाला टेकला.

"काय झालं?" घाबरत, उभी होत, आपलं डोकें एका बाजूला कलवून, ऐकत, तिनें विचारलं.

तिची तटस्थ वृत्ती, तो एक पुरुष म्हणून तिनें दाखविलेली पूर्ण अनास्था, याची आपल्या विचारांना खीळ घालण्यास त्याला मदत झाली.

"कांहीं नाहीं. मला वाटतं. ." तो हळूंच हंसून म्हणाला. "फक्त मी जरा मनदुबळा आहे, असं मला वाटतं. मुळींच कांहीं घडलेलं नाहीं."

भिण्यासारखं कांहींच कारण नव्हतं हें सिद्ध करण्यासाठीं तो खाली बसला.

'मला नवल वाटतं,' पुनः त्याच्याजवळ बसत ती म्हणाली, 'हें असेंच किती काळ चालणार याचं मला नवल वाटतं. म्हणजे हें असं जगायचं, मी म्हणते. सर्व वस्तूमात्रांपासून आपण किती दूर आहोत. आपल्याला कळत नाही—' गुणगुणत प्रार्थना करतांना तिचा स्वर अधिकाधिक मृदु झाला. तो नाविक तिथेंच बसला, ऐकत, आणि त्याच्या उध्वस्त मनःस्थितीवर एक विचित्र शांततादायक परिणाम होत आहे असं त्याला भासलं. जंगलांतील इवल्याशा जीवजीवाणूंची किरकिर सोडून दिली तर त्यांच्या भोंवती रात्र स्तब्ध झाली होती. मग बॉम्बवर्षावाने उध्वस्त झालेल्या त्या दरींत एक जनावर ओरडलं. आणि लगेच जंगल नीरव झालं. ती नीरवता आपण ऐकत आहों असं ॲलिसनला आपलं आपणच आढळून आलं. दूर पलिकडे जेव्हां पुनः एक जनावर ओरडलं तेव्हां त्याला आनंद वाटला. त्यानंतर पुनः किरकिर सुरू झाली. तो उठला आणि त्या ठाण्यावरून आणलेल्या फुटकळ वस्तूच्या ढीगाकडे गेला. जुने कागद, फळ्या, छपरावरचे लोखंडी पत्रे. बहुतेक सर्व कागदांचं एक वेगळं गाठोडं होईपर्यंत त्याने ते त्या ढीगांतून शोधून काढले.

त्याने सिस्टर ॲंजेलाला आपल्याजवळ बोलावलं आणि तो कागदाचा ढीग तिला दाखविला. आणि म्हणाला, "तिथं. तू तिथें पडून रहा, सिस्टर. मी फार दूर असणार नाही."

"आभारी आहे." ती उत्तरली.

त्या काळोखांत ती दृष्टीआड होईपर्यंत तो दूर चालत राहिला. मग झाडाला पाठ टेकून पुनः तो खाली वसला. तिला भोंवती वावरतांना कांहीं काळ त्यानं ऐकलं. मग ती स्तब्ध झाली. भूत आणि वर्तमान परस्परांत मिसळींत त्याचे विचार स्वैर भटकूं लागले. अगदी दमून, गळून, गेल्यासारखं त्याला वाटलं; आणि लवकरच तो झोपी गेला.

सकाळीं त्या जोगीणीला तशीच निद्रीस्त सोडून तो खाली त्या छोटया नदीवर आंघोळीसाठी गेला. त्यानें हातपाय तोंड धुतलं आणि आपल्या खांद्यावर व पाठीवर पाणी शिंपडलं. मग सूर्यप्रकाशांत त्याने आपलं अंग सुकवलं. नंतर अंगावर कपडे चढवून त्या मंदिराचे जे कांहीं अवशेष उरले होते त्या स्थळीं तो आला. त्या पडझडींतून अजूनही धूर बाहेर पडत होता. त्या मोडतोडीमध्यें त्याला एक मोठा टणक लाकडाचा ओंडका मिळाला आणि त्याने तो आगींत सारला. त्यावर रानटी डुकर रानवट पक्षी आणि मासे भाजणं त्यांना शक्य होणार होतं.

ती आग पेटत राहील अशी खात्री होईपर्यंत त्याने ती निरखून पाहिली. मग तो टेकडी चढून वर गेला. सिस्टर ॲंजेला त्या जुनाट कागदाच्या ढीगारावर बसली होती. तो दृष्टीला पडताच तिच्या चेहऱ्यावरची चिंता बरीच कमी झाल्याचं त्यानं पाहिलं. त्याच्याकडे







पाहून प्रश्नार्थक मुद्रेनें तिनें हास्य केलं कारण त्याला आपल्याला कांहीं सांगायचं आहे हें ती ओळखूं शकली होती.

"मी आग मिळविली आहे" तो म्हणाला. "परंतु अजून तिच्यावर शिजविण्यासारखं कांहीं मिळालेलं नाहीं. त्या इवल्या जुनाट मंदिर पैकीं केवळ आतां कांहींच शिल्लक उरलेलं नाहीं." तो पुढें म्हणाला "त्या बॉम्बनी खरोखरच त्याचा फडशा पाडला."



ती त्याच्यापासून दूर झाली व जंगलांतून दूर पलिकडे पाहूं लागली. तिने उसासा टाकला आणि एखाद्या हरवलेल्या व म्यालेल्या मुलाप्रमाणे तिने आपला एक हात तोंडावर घेतला. त्या अरण्यप्रदेशांत मंदिराच्या आणि मंदिरांतील घंटांच्या जगापासून फार दूर असलेली ती त्या संध्याकाळीं फार लहान मुलासारखी दिसूं लागली— विमुक्तीच्या आशेला दुरावलेली ! ती इतकी विचित्र आणि एकाकी दिसूं लागली कीं ॲलिसनला तिची विलक्षण कींव आली. तो हळुवारपणें म्हणाला "अग सिस्टर, मी तुझी काळजी घेईन. मी तुझ्यासाठीं दक्ष राहीन."

"मी जाणते," डोकं वर न उचलतांच ती पुटपुटली. "मी जाणते. त्यावेळीं मी माझा धीर सोडला. याबद्दल मला वाईट वाटतं. मंदिर तिथं होतं तोंपर्यंत इतकं कांहीं अमंगळ वाटत नव्हतं. तें— आतां, तूं जाणतोस, कुठेंच कांहीं— मला कुठेंच कांहीं नाहीं. क्षणभर मला हरवल्यासारखं वाटलं. मला वाटलं कीं परमेश्वराला माझा विसर पडला आहे. तें खरं नाही. छे, तें खरं नाहीं. तो केवळ माझा दुबळेपणा होता. आपण किती दुबळे आहोंत. हें कांहींच नाहीं. आतां यावेळीं आपण आहोंत. त्यांत कांहींच नाही. आपल्याला जिथं पाठवलं जातं तिथं प्रश्न न विचारता आपण जातो. तें विसरण्यांत मी किती पण चुकलें होतें. आभारी आहे, मिस्टर ॲलिसन, तूं माझी काळजी घेशील हें मला ठाऊक आहे. माझं सगळं कांहीं ठीक आहे."

तिच्याकडून त्याच्या स्वतःच्या मनाने धीर मिळविला.

"खाऊं या" तो प्रसन्नतेने म्हणाला. "मला किती तरी काम करायचं आहे."

त्याने त्या टेकडीच्या माथ्याजवळ एक पुष्कळ मोठी पाने असलेलं छोटं झुडूप पाहिलं होतं. त्याच्याजवळ, जिथं जमिनीत खणणं सोपं होतं, तिथें आतां त्याने एक पांच फूट खोल विवर तयार केलं. मग त्या झुडपाच्या पसरट खांद्याच्या खालीं जाईल इतकं तें विवर त्यानें लांब खणलं. त्याचा परिणाम म्हणजे एक सात फूट लांब, चार फूट रुंद, आणि पांच फूट खोल भूमिगत जागा तयार झाली. त्या झुडपाच्या विरुद्ध बाजूला त्याच प्रकारचं एक विवर त्याने जमिनींत तयार केलं. सुमारे चार फूट जाडीच्या भिंतीने तें दोन्ही खड्डे वेगवेगळे केले गेले होते.

त्या तुटीफुटीच्या ढीगांतून जुन्या फळ्या घेऊन त्या खड्ड्यांसाठीं त्याने जमीन तयार केली. बंगल्याच्या छपरांतून खेचून काढलेल्या त्या जुनाट लोखंडी पत्र्याचा त्याने भिंतीसाठी उपयोग केला. वर भूमीवर, त्या झुडपांच्या उतरत्या खांद्यांखालीं त्याने गवती घाणीची एक भिंत तयार केली आणि त्या खड्ड्यांतून ओबड धोबड छप्पर तयार करण्यासाठीं त्या खालीं लोखंडी पत्रे घातले. ते खड्ड्याचं काम संपविल्यानंतर, त्याचं प्रवेशद्वार छपविण्यासाठी त्याने वेलींची व रोपट्यांची भोंवती योजना केली. तें दृश्यफळ पाहून त्याला समाधान वाटलं. तिथें ते खड्डे आहेत हें अगोदर जाणल्याशिवाय दहा फुटावरून जाणाऱ्या एखाद्या व्यक्तीला ते खड्डे ओळखता आले नसते.

पहिला खड्डा तयार झाल्यावर ॲलिस ने सिस्टर अँजेलाला तिथें नेलं. त्याला छपविणाऱ्या आच्छादनांतून खाली घसरून कसं आंत जायचं हें त्यानें तिला दाखविलं आणि तिच्या पाठोपाठ तो विवरांत गेला. त्या झुडपाच्या पश्चिमेला तो खड्डा होता; दुसरा ईशान्येला होता. त्या विवरांत दोन माणसांना पुरेशी अशी जागा क्वचितच होती, परंतु आपल्या कमाईचा ॲलिसनला अभिमान वाटत होता. त्या जोगीणीनं त्या खड्ड्याचं कौतुक केलं व त्याच्या कौ त्याची तारीफ केली तेव्हां त्याला आनंद झाला होता.

"तें तुझं आहे," तो म्हणाला, "तुला आवडेल त्या पद्धतीनें तू तें लावून घे. अंग टाकण्यासाठीं हवं तें गवत व वस्तू मी बाहेर जाऊन कापून आणतो."










दिवस निसटून जात होते. त्यांचे केस अधिक लांब वाढले आणि सूर्यप्रकाशांत त्यांच्या कपड्यांचा रंग वदलला. एकदा दुपारीं, दक्षिण-कडे सरळ रेषेंत जपानी विमाने त्यांच्या वरून उडत गेली. त्यानंतर दोन दिवसांनीं, अधिक विमाने वर आली. त्या गटांत ल चार विमाने गटांतून वाहेर सरकली आणि कांहीं काळ त्या वेटावर पुढे व मागे उडाली, मग आग्नेय दिशेला निघून गेली. दुसऱ्या रात्रीं त्या बेटाच्या आग्नेयेकडील कोपऱ्यांतून वर उडत गेलेली विमाने त्यांनी ऐकली. ती विमाने जपानी होती याबद्दल त्यांना संशय नव्हता.

सिस्टर अँजेला आपल्या खड्ड्यावर दोन दिवस काम करीत होती; ती फक्त दिवसा काम करीत होती कारण त्यांच्याजवळ प्रकाश नव्हता. मग आपल्या परिश्रमांची परिणति पाहण्यासाठीं तिनें ॲलिसनला आमंत्रण केलं. ॲलिसनने अरण्यांतून आणलेल्या थोटक्या लागडी ओंडक्यांचा उपयोग करून तिने एक चौकट तयार केली होती. आणि विछाना वनविण्यासाठीं त्यांच्यांत गवत आणि पाने भरली होती. मोठ्या रुंदट व ओवडधोवडपणे रचलेल्या पानांचं तिनें एक ठुसकं टेवल तयार केलें होतं. त्यावर जुन्या मंदिररांतील वाडगे, नारळाच्या कांहीं करवंट्या, आणि ज्यांचा उपयोग होईल असं तिला वाटलं होतं अशा कांहीं छोट्या काठ्या तिने ठेवल्या होत्या. त्या खड्ड्यांत आणखी कांहीं नव्हतं. तथापि त्या काळोख्या विवराला अगोदरच व्यक्तित्व प्राप्त होऊं लागलं होतं. त्यांत आतां राहीलं जात होतं, आणि मानवी घर चं चैतन्य आणि स्वरूप त्याला येऊं लागलं होतं. छपराखाली भितीं ॲलिसनने एक छोटा चौकोनी कोनाडा पाहिला आणि त्याकडे तो चौकस बुद्धीने पाहूं लागला.

ती किंचित् हंसली. "तें माझं मंदिर आहे." ती मऊ स्वरांत वोलली. "तूं तें पाहूं शकतोस."

आदरपूर्वक पुढे पावलें टाकून तो त्याच्याजवळ गेला. त्या चौकोनी विळांत, ती नेहमी धारण करीत असलेली जपमाळ व छोटा क्रॉस फुलांच्या पानांत पडून होता. त्यांच्याकडे पाहतांच, त्या जोगीणीच्या परिस्थितीची अनुकंपा येऊन तो कळवळला. त्याला तिला कांहीं सांगायचं होतं; असं कांहीं कीं जें तिला सहाय्यक होईल, परंतु त्याला शब्द सांपडेनात. त्याऐवजीं त्याच्या डोक्यांत एक विचार आला. 'एका मिनिटांत मी जाऊन येतो.' असं म्हणून व तिला गोंध-ळांत टाकून तो त्या खड्ड्याच्या वाहेर निसटला.

ॲलिसन खाली दरींत गेला आणि त्या मंदिराच्या पडझडींत शोधूं लागला. वॉम्व वर्षावानें वांकलेला एक जुना लोखंडी क्रॉस तिथें पाहिल्याचं त्याला आठवलं. त्या मंदिराच्या छपरांतून वहुधा तो खाली आला असावा. त्यानें तो शोधून काढला, त्या मोडतोडींत अजून जळणाऱ्या ओंडक्याकडे तो नेला, तो तापवला, आणि तो पुष्कळसा पुन: चांगला सरळ होईपर्यंत त्या क्रॉसवर त्यानें घाव घातले. तो सुमारें एक फूट लांव होता. नदींत तो त्यानें थंड केला. आणि माघारे खड्ड्याकडे उचलून नेला. खड्ड्यावाहेर उभी राहून सिस्टर अँजेला त्याची वाट पहात होती. आणि कांहीं न वोलतां तो क्रॉस त्यानें तिच्या हातांत दिला. जेव्हां तिनें तो कृतज्ञतेनें स्वीकारला आणि आपल्या छातीशी घट्ट आवळून धरला, तेंव्हां तिच्या मुद्रेंत तरळणारं दृश्य पहायला दयनीय वाटत होतं.

[ क्रमशः ]



अनुक्रमणिका






# एका महा(न)युद्धाची गोष्ट

**युद्धस्य** कथा रम्यः ! खरं आहे. हे युद्धाचं दास्तान ऐकण्याला नि वाचण्याला मोठं मनोरंजक, रम्य असं असतं यांत काडीमात्र शंका नाहीं. परंतु प्रत्यक्ष युद्ध अनुभवणाऱ्यांनाच ठाऊक कीं ते रम्य नसून दुर्दम्य असतं.



–भालचंद्र सुळे

आतां माझंच घ्या ना, तुम्हाला ही महा(न) युद्धाची गोष्ट एकंदरींत बरी वाटेल. कदाचित तुम्ही हंसाल, कदाचित नाकही मुरडाल. पण युद्धांत घायाळ झालेला मी ! शेळी जाते जीवानिशी अन् खाणारा म्हणतो... !

या—या शेळीवरूनच युद्धाला प्रारंभ झाला. तुम्ही म्हणाल हल्लीच्या युगांत वास्तविक जेट, क्रूझर, टार्पेडो असलीं नांवं घ्यायचीं सोडून हे शेळीवरून कसलं बुवा युद्ध ? पण महाराजा, तसं कांहीं नाहीं. आमच्या शत्रूचा नुसता आवाजच पन्नास मेगॅटनपेक्षां थोडा सरस ठरेल. (हे नुसतं लिहितांना सुद्धां मला स्वयंपाकघराच्या दिशेनें कानोसा घ्यावा लागतो.) कारण आमचं शत्रुराष्ट्र (अर्थात आमचं कुटुंब हें आपण सूज्ञ असल्यामुळें जाणलं असेलच ) जर कडाडलं तर तो आवाज सहन करण्याची ताकद फक्त माझ्याच अंगीं निर्माण झाली आहे असं मला वाटतं. याला दुसऱ्या अर्थी कोडगेपणा म्हणा हवं तर. आमची ही हिंसावादाची पुरस्कर्ती तर मी पडलो अगदींच अहिंसावादी (सौ. च्या मोजमापांत अगदीच "हा".) अहिंसावादी पुढाऱ्याप्रमाणें शेळीचं दूध पिवून जीवन जगत नसलो तरी शेळीचं जिणं मात्र जगत आहे.

हां! तर या शेळीमुळेच रणदुंदुभी झडो लागल्या ! त्याचं असं झालं, बुधवारीं सकाळी मी जागा झालो तो अर्धा तास लवकरच. आणखी अर्धा तास झोंपण्याचा विचार केला. नंतर तब्बल अर्धा तास मिळणार होता प्रातर्विधी (म्हणजे संडासमार्जन स्नानभोजनादी विधी) उरकण्याला. आठ पस्तीस अगदी सहज मिळाली असती. एक लांबलचक जांभई दिली नि साखर झोपेची चव घेत मिटक्या मारीत सुखानें डोळे मिटले. इतक्यांत हॅन्डग्रेनेडप्रमाणें एक पिशवी माझ्या उघड्या तोंडावर येऊन आदळली. आणि पाठोपाठ हुकूम सुटला 'उठा उठा, लोळपटूं नका. बाजारांत जा !' उघड्या तोंडांत गेलेल्या पिशवीची चव नि वास यावरून मी ओळखलं पिशवी 'स्पेशल' आहे. मी एका उडींतच कॅलेंडरकडं धांवलो. पुन्हां पुन्हां पाहिलं, डोळे चोळून पाहिलं. आज बुधवारच होता. रविवार नव्हताच. मी खात्रीपूर्वक हंसत आंतल्या खोलींत गेलो'. 'हं, हं, अग सुमा, आज रविवार समजलीस वाटतं. आज बुधवार आहे. सांडग्याच्या आमटीचा वार. सांडगे संपले असले तर....'

'अगदींच कसे हो तुम्ही हे ! अहो. आज आई नि बेबी नाहीं का यायच्या त्यांच्या-

> **युद्धाला 'तोंड' लागलें. गनिमी हल्ले-प्रतिहल्ले सुरू झाले. अधुनमधुन तोफा गरजूं लागल्या. मान्याच्या जागा टिपल्या जाऊं लागल्या आणि अचानक युद्धाचा सारा रंगच पालटून गेला.**
>
> **ॲटम बॉम्बमुळें ? छे : ! छे : !!..........**

साठीं चांगलं कांहींतरी आणा. बेबीला फ्रिनई पापलेट फार आवडतो. तुम्ही बाजारांत जाऊन या नि मग कल्याणला जा त्यांना उतरून घ्यायला'. सौ.

'अग पण आज मला ऑफिस'...मी.

'वघा, गेले चार दिवस मी तुम्हांला वजावते आहे कीं, बुधवारीं रजा घ्या. नसली घेतली रजा तर जाऊं नका आजचा दिवस. मुलखानिराळे तुम्हीच नाहीं ऑफिसमध्यें जात. लोकांचे पुरुष वघा. महिना महिना रजा घेतात. आमचं मेलं नशीवच खोटं.' सौ.

'सुमा, मी हवं तर आज उशीरा जाईन. कारण इमर्जन्सीमुळें —' मी.

'जळ्ळी तुमची इमर्जन्सी. वरं उशीरा जा. पण गडे जातां ना वाजारांत. बेबीला फ्रिनई—' सौ.

'पापलेट फाऽऽर आवडतो' मी.

कधीं काळींच वांटचाला येणारा जास्त दूध घातलेला पांढरा शुभ्र चहा घेऊन वाजारांत गेलो. बाजारांतून परत आलो तेव्हां सौ. पुढल्या खोलींत नव्हती. आंतल्या खोलींतून कोणाच्या तरी बोलण्याचा नि सौ. च्या हुंदक्यांचा आवाज आला म्हणून हलकेच गेलो नि कानोसा घेतला. आमच्या सासुबाईंचा आवाज मी तावडतोब ओळखला. '...आतां मी आले नं तायड्या...मी सगळं कांहीं पाहून घेईन. अगं, रडून काय होणार आहे ? इथून तिथून मेली पुरुषाची जातच–'

'अय्याऽऽनाना आले.' सौ. ची धाकटी पाती केकाटली. नाइलाजानें पुढें झालो.

'अरे वा, आई आल्या वाटतं ! आणि गाडी आज विफोरटाईम आली कीं काय दोन चार तास ?' मी.

'छे हो, माझंच चुकलं ! ह्यांना सांगितलं नं तिकीटं रिझर्व करायला. जिथे तिथे मी तडफडायला हवं. ह्यांच्याच्यानीं एक काम घड होईल तर शपथ. जनतेच्या तिकिटाऐवजीं यांनीं रात्रीच्या पॅसेंजरचीच तिकिटं आणली. म्हणे चुकून. म्हटलं पॅसेंजर तर पॅसेंजर. ताईचं पत्रच आलं होतं कीं —'

सासुबाईंच्या तडतडवाजांतलं माझ्या डोक्यांत कांहींच शिरायला कबूल नव्हतं. फक्त शेवटचं वाक्य शिरायच्या बेतांत होतं. पण ते सौ. च्या नेत्रसंदेशानें अर्धवटच तुटलं. मी खाडकन् भानावर आलो. म्हटलं इथं कांहींतरी कारस्थान शिजतंय्. आल्याबरोबर मायलेकींची गुप्त बैठक–सौ. चे हुंदके–पाठोपाठ सासूबाईंचा जिव्हाळा नि पुरुषजातीबद्दलचं वाक्तांडन. आतां पत्राची भानगड नि त्याबरोबर नेत्रसंदेशाची देवाण घेवाण. मीही अस्तन्या सारल्या. दंड थोपटले. म्हटलं, बघून घेईन (अर्थात मनांतल्या मनांत.)

"अय्याऽऽहे गं काय ताई ? खोटंच सांगितलंस आम्हांला नाना पापलेट आणायला गेलेत म्हणून ? आई, हे बघ काय आणलंय ! शीऽऽ!' मी आणलेल्या पिशवीबरोबर बबी झगडत होती.

'अरे हो ! अगं सुमा, सांगायला विसरलोच. बाजारांत तसलं कांहींच नाहीं मिळालं म्हणून हे आणलं. हो, सासुबाईंना मेजवानी घ्यायला हवी नां ! हेंः हेंः हेंः।' माझं दुवळं समर्थन.

'आणि हे हो काय नाना ? बकरीचं दिसतंय ! शीः शीः ! ताई, तूं कां नाहीं गं जात बाजारांत ? अगं, जिथं तिथं आपण मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं. या पुरुषांवर विश्वास नि गळयाला फांस !' सासुवाईंच्या प्रवचनाला वगल देऊन मी काढता पाय घेतला. तरी जातां जातां सौ. ची तक्रारवजा बडबड ऐकलीच. 'हे अस्सं असतं बघ आई. हे सगळं मुद्दाम वरं. नेहमी स्वतःचंच घोडं दामटायचं. हेच बघना, त्यांना आवडतं ना म्हणून आणलं. तें तरी आणायचं कळतंय ? आणून आणलं तेही शेळीचं !'

आणि या शेळी प्रकरणापासून या वाघ शेळीच्या महा(न)युद्धाला सुरुवात झाली. सकाळपासून संध्याकाळपर्यंत सौ. ची नि सासूबाईंच्या टक्क्या टोमण्यांची हिसक गुरगुर, जोडीला बेबीची किरकिर अन् माझी मात्र दुवळी, अहिंसक बें बें ! !

गेले दोन दिवस मी जे भोगत होतो ते अखिल भारतांतल्या जनतेनें दीडशें वर्षांच्या पारतंत्र्याच्या काळांतही भोगले नसेल. घडणाऱ्या प्रत्येक लहानसहान घटनेनें मी हैराण होत होतो. अस्वस्थ झालो होतो. काल संध्याकाळीं ऑफिसमधून आलो तर सासुवाईंच्या व्याख्यानाचा विषय होता सिगरेट अन् बोलण्याचा रोख होता म्यां पामरावर ! मी पाय न वाजवतां दारांतच थवकलो.

'तायडे, या सिग्रेटीपासून सांभाळ हो ! यांनीं म्हणे कॅन्सर कीं कायसा रोग होतो. आयुष्याचा सत्यानाश होईल वरं ! काय ग, तुझा नवरा ओढतो कां ?' सासुबाई.

सौ. कडे केविलवाण्या नजरेनें पहात मी खिशांतलं पनामाचं पाकीट चाचपलं. सौ. चा पॉवरफुल डोळा माझ्यावर रोखलेला होताच. मी चक्क हात जोडले. दुरूनच न सांगण्याबद्दल विनवले. आणि–अहो आश्चर्यम् ! मी आयुष्यांत प्रथमच आश्चर्य अनुभवलं.

'हे ? न–नाहीं बाई !' सौ. नी (कशी कोण जाणे !) माझी बाजू घेतली होती. 'गेलीस गऽऽबाई वळणावर ! मी तुझ्यासारखी वागले असते तर नसता हो केला अठ्ठावीस वर्षं संसार. एकदांच तुझ्या आण्णांच्या खिशांत विडी सांपडली एक, तर मी काय केलं ठाऊक आहे तुला? काय केलं असेल ?' सासुबाई.

'काय केलसं ?' सौ.









'मी साफ वजावलं, म्हटलं. मी उद्यां ऑफिसमध्यें येऊन तुमच्या साहेबाला सांगते कीं, पगारांतली एक कपर्दीकही यांच्या हातांत देऊं नका. आज विड्या फुंकतात, उद्यां दारू पितील !'

'अय्या, अग गेली होतीस ?'

'छे ग ! जाते कसची ? पण तेव्हांपासून आण्णांनी सुपारीचं खांड सुद्धां मी दिल्याशिवाय चघळलं नाही.

'कमाल बाई !'

'कमाल कसली कार्टे ? एवढं सगळं सांगायचं कारण–हे बघ सिग्रेटीचं पाकीट ! तुझ्या नवऱ्याच्या कोटांत सांपडलं'.

'स— सांपडलं ? तुला ?'

'सांपडलं म्हणजे, चुकून माझा हात कोटाला लागला म्हणून मला समजलं. पण तुला नसतं समजलं वरं या जन्मांत ! म्हणून नेहमी नवऱ्याचे खिसे तपासायची संवय असावी सांगून ठेवते. केव्हां कसली भानगड हाताला लागेल नेम नाहीं. आणि नवऱ्याची भानगड नि म्हशीची कालवड दुर्लक्ष केलं कीं, मोकाट सुटते !'

माझ्या कपाळाच्या शिरा ताडताड उडत होत्या. जे चाललं होतं ते मला समजेनासं झालं होतं. माझ्याच घरांत मला सुधारण्याच्या (?) योजना आंखल्या जात होत्या. माझ्याच घरांत माझं अस्तित्व हिरावून घेतलं जात होतं. या युद्धाचा शेवट माझ्यावर सार्वभौमत्वाचें हक्क गाजविण्यांत होणार होता. मी ठरवलं, तें कांहीं नाहीं. आपण उठाव केला पाहिजे. तावडतोब ! आत्तांच्या आत्तां ! मग बेत बदलला. म्हटलं आतां नको. मग बघूं. कारण बरोबर सहा वाजतां बंडू कर्णिकाकडे रमी मंडळाची मीटिंग होती नि कॅट माझ्याकडे होते. मला जायलाच हवं होतं. मी कॅट काढण्यासाठीं धाडकन् कपाट उघडलं. त्यामुळें माझं आगमन जाहीर झालं. पण माझा रागाचा पारा एकाएकी चढला. कॅट जागेवर नव्हते.

'सुमा, कपाटांतले कॅट कुठे-आहेत ?' आज (सौ. ऐवजी ) मी कडाडलो.

'कसले कॅट ?' सौ. चा मवाळ प्रश्न.

'माझे पत्त्याचे कॅट. उगाच वेड पांघरून पेडगांवला जाऊं नको !' मी आवाजाची एक पट्टी वाढवली.

'अहो नाना, वायकोला माणसाप्रमाणें वागवावं. असं ओरडूं नये. तुम्हीं म्हणतां ते कॅट कां फॅट मला बेबीनीं आणून दिले खरे सकाळीं. तुमचे होते कां ते ?' सासुबाईंचा साजुकपणा.

'अय्याऽ मी किनई नाना, पेशन्ससाठीं एकच कॅट घेतला होता. तर आईनी दो...' बेबीची किरटी किरकिर.

'तू गप्प बैस गं कार्टे ! एकदा बरं कां नाना, मुलींच्या आण्णानीं .....'

'पत्त्याचं बोला !' मी.

'मी ते बंबांत टाकले !' सासूबाई.

'बंबांत ? ?' मी.

'हो बंबांत. म्हटलं या घरांत असले जुगारी डोहाळे नकोत. म्हणून —'

'पण तुम्हीं माझ्या पत्त्यांना हातच कां लावलांत ? या घरांत—या घरांत–' मला पुढें बोलायला सुचतच नव्हतं. आणि सुचतं तरी चान्स नव्हता. मी नुसता कपाळावर घाम टिपत उभा राहिलो.

'बाई बाई सुमे, उभ्या आयुष्यांत नव्हता ग बाई एवढा अपमान सहन केला. जुगारी सारखा नाद आयुष्याची राखरांगोळी करतो म्हणतात. म्हणून धडपडायचं. दुसरं काय ? पण तुझ्या पत्रांतलं वाक्य न वाक्य खरं आहे गं बाई. माणसं पारखतां नाहीं आली तुझ्या आण्णांना, आण्णा भोळे नं ! बोलायला नको—'

पुढचं ऐकायला मी थांबलो नाहीं. चपला अडकवल्या नि बाहेर पडलो. ताड ताड चालत सुटलो. जेमतेम गल्लीच्या कोंपऱ्यापर्यंत पोंहोचलो असेन तोंच दामले साहेबांनी ( हे आमच्या ऑफिसमध्यें डेप्युटी आहेत नि सासुबाईंचे लांबचे भाऊ लागतात) मला दोन्हीं दंडाला धरून उभं केलं.

"वा नाना ! आम्हीं तुमच्याकडे आलो एवढ्या लांबून आणि तुम्हीं कुणीकडे चाललात असे धांवत पळत अन् एवढ्या कसल्या विचारांत मश्गुल आहांत ?' दामले.

'जीव द्यायच्या विचारांत आहे आणि आत्महत्त्या करायला चाललो !' मी.

'अरे, अरे, एवढा कसला त्रागा करताय ? आमची यमू (सासुबाई आमच्या ! ) कांहीं बोलली कां ? काय झालं मला सांगा पाहूं !' दामले.

'काय झालं ? ऐकायचंय तुम्हांला ?' मी जवळ जवळ खेंचतच दामल्यांना समोरच्या इराण्याकडे नेलं. दोन स्पेशलची ऑर्डर दिली नि त्यांना सासुबाई आल्या दिवसापासून ते आत्तांपर्यंतचा इत्थंभूत वृत्तांत ऐकवला. ऐकून दामले हंसले. हंसून म्हणाले, 'मला याची कल्पना होतीच. अहो नाना, तुम्हीं तुमच्या सासूला सासू म्हणून गेली दोन वर्षं ओळखताय् पण मी तिला आमची वहीण यमू म्हणून लहानपणापासून चांगलीच ओळखतो. तेव्हां, असं चालायचंच. आपण दुर्लक्ष करायचं. पण तुम्हांला मी एक तोड सुचवणार आहे'.

'तोड ?' मी.

'हो तोड ! एकदम लढाई खतम ! असं करा ———'

दामल्यांची योजना ऐकून आम्ही अर्ध्यातासानें हॉटेलांतून बाहेर पडलो. हंसत हंसत एकमेकांचा निरोप घेतला. 'मग, आतां मी यायचं कारण नाहीं. उद्यांची व्यवस्था मी सांगितल्याप्रमाणें करा म्हणजे झालं.' दामले जातां जातां म्हणाले.

'आणि एक लक्षांत ठेवा हं नाना !'

'काय ?' मी .

'हो, आपलं स्पष्ट सांगितलेलं वरं. आमची यमू दिल्लीला राहिली होती या सववीवर 'खाण्याच्या' बावतीत सुधारली आहे नि तिच्या आग्रहामुळें तुम्हींही सुधारलांत. पण उद्यांच्या पाहुण्यांना तुम्हीं खातां तसलं अब्रह्मण्य कांहीं चालत नाहीं बरं कां आणि मलाही ! रागावूं नका.' दामले.

'छे, छे ! त्याची नका काळजी करूं. आम्हीं कोणाला पत्ताही लागूं देत नाहीं त्याचा !' मी हमी दिल्यानंतर दामले गेले नि मी घरीं आलो.

मी घरीं आलो तेव्हांचा घरांतला 'शीण' बघण्यालायक होता. सगळी आवराआवर चालली होती. प्रवासाच्या तयारीची धामधूम सुरू होती. सौ. नी माझ्या समोरच एक सुटकेस आणून आदळली. व एक एक कपडा आणून त्यांत भरूं लागली. हेतु हा कीं,

विचारावं कुठें चाललीस म्हणून. मी स्वत:-शींच बडबडलो, 'उद्यां आमच्या ऑफिसमधला वापट यायचाय ! सौ. ने फक्त कपाळाला आठ्या घालून प्रश्नार्थक मुद्रेनें माझ्याकडे पाहिलं.

'बी. ए. आहे. तीनशें रुपये पगार आहे, यंदा कर्तव्य आहे. अन् हुंड्याची कांहीं अट नाहीं !' मी.

'? ? ' सौ.

'अनायासे तो येणारच आहे तर शेजारच्या गोडबोल्यांची मुलगी दाखवावी म्हणतो त्याला.'

'अय्या, मग आपल्या बेबीला—' एकाएकी सौ. फुगा फुटल्यासारखी ओरडली.

'दाखवली असती. पण तुम्हीं कुठेंतरी बाहेरगांवीं चालला आहांत असं मला...' माझं वाक्य अर्धवट सोडूनच सौ. आंतल्या खोलींत धांवली. बाहेर आली ती मातोश्रींना घेऊनच. दोघीही तोंडभर हंसत होत्या. सासूबाई माझ्या समोरच फतकल मारून बसल्या.

'तायडीनीं सांगितलं हो नाना तुम्हीं केलेल्या खटपटीबद्दल ! तरी मी बेबीला बजावते की, तुझं लग्न जमवतील तर नानाच. तिचे आण्णा काय ? अगदीच भोळे, बोलायला नको अगदीं पण मोठा जांवई मात्र अगदीं लाख माणूस शोधून काढला त्यांनीं. तायडे, नशीबवान आहेस ग बाई ! मीच मेली फाटक्या तोंडाची. नाहीं नाहीं ते बोलले मघां ! पण काय हो नाना, मुलगा काय करतो म्हणालांत ?' दामल्यांची मात्रा लागू पडली होती. पुण्याला जाण्याचा बेत रद्द झाला होता. उद्यां मुलगी पहायला भावी जांवई यायचे होते नि त्यांना मेजवानी देण्याचा बेत मुक्रर करण्यांत आला.

वास्तविक मुलगा दामल्यांच्या अगदी खिशांतलाच होता. त्यांनी त्याला बेबीचा फोटो दाखवला होता व फोटोवरून त्याला मुलगी पसंत होती. दामल्यांनी त्याच्याशी बोलणी करून सर्व कांहीं ठरवलं होतं. फक्त मुलगी पहाण्याचा औपचारिक कार्यक्रम बाकी होता. परंतु जेव्हां माझ्याविरुद्ध पुकारलेल्या युद्धाची हकीकत मी दामल्यांना ऐकविली, तेव्हां माझ्यावरचं अरिष्ट टाळण्यासाठीं, त्यांनीं केलेल्या एकंदर कामगिरीच्या श्रेयाचं माप सर्वश्री माझ्याच पदरांत पडेल अशी योजना त्यांनीं आंखली होती.

दुसरे दिवशीं—म्हणजे आज—मी वापट नि दामले बासुंदीपुरीवर ताव मारून ढेकर देत बाहेरच्या खोलीत येऊन बसलो. थोड्या वेळानें दामल्यांनी आमच्या सासुबाईना हांक मारली. 'यमु, अग यमूताई, जरा बाहेर ये !' सासुबाई बाहेर आल्या. दामले म्हणाले 'हे बघ, सुरुवात झाली !'.

'कशाला ?' सासुबाई.

'जुन्या जावयांनी नव्या जावयांचे कान फुंकायला सुरुवात केली ?'

'म्हणजे ?' वर वर हंसत पण माझ्याकडे जळजळित कटाक्ष टाकीत सासुबाईनीं विचारले.

'अग, नव्या जावईबापूंना पत्ते खेळण्याचा म्हणे फार शोक आहे. ते नानांना म्हणाले, 'पत्ते असते तर रमीचे चार डाव टाकले असते. तर नाना कसे म्हणतात, पत्ते आमच्या सासुबाईनी बबांत टाकले बोला आतां !' दामले

'इश्य ! अरे, आमचे नाना म्हणजे पक्के विनोदी. ते एकाद्याची चेष्टा करायला लागले कीं, मग सासू नाहीं बघणार नि सासरा नाहीं बघणार.'

'हो, पण पत्त्याचं काय ?'

'अरे, काल काय झालं, मी कपाटांत दोन कॅट पाहिले. कसले होते म्हणतोस, अगदींच चार चार आणेवाले दिसत होते. मला आला राग. सरळ उचलले नि टाकले बंबांत. म्हटलं, नानांसारख्या माणसांनीं असले पत्ते वापरावे म्हणजे काय ?' सासूबाई सज्जड थाप ठोकत होत्या. मला ते ऐकवत नव्हतं.

'पण काल तर—' मी कांहीं तरी बोलणार होतो. पण दामल्यांनी माझ्या पावलावर कचकचित लाथ मारल्यामुळे वेदना सहन करीत गप्प बसलो. सासूबाईंनी तर मला झुरळ झटकावें तसे झटकून माझ्याकडे लक्षच नाहीं असें दाखविले.

'मला बाबा राहवलं नाहीं. काल संध्याकाळीं बाजारांत गेले नि चांगले पांच पांच रुपयाचे दोन कॅट आणले.' आणि सासूबाई लगबगीनें आंत धांवल्या. माझा आश्चर्याचा धक्का ओसरण्यापूर्वी खरोखरीच दोन चांगल्यापैकी कॅट सौ. ने आणून दिले. आणि आम्हीं खेळण्यास सुरुवात केली. इतक्यांत वापटांनीं खिशांतून गोल्डफ्लेकचं पाकीट काढलं. एक सिगरेट दामल्यांना दिली, एक स्वतः घेतली नि माझ्यापुढे एक केली. मी भीत भीत इकडे तिकडे पहात, न राहवून सिगरेटला हात घातलाच. दामल्यांनीं मला नजरेनेंच धीर दिला. आणि सासूबाईंना हांक मारली. मी सिगरेट लपविण्याचा प्रयत्न करूं लागलो. दामल्यांनीं सहानुभूतिपूर्वक माझा हात दाबला.

'अग यमू, जावईबापूंना काड्यांची पेटी हवीय !' दारापर्यंत आलेल्या सासूबाई दामल्यांचं वाक्य ऐकून लगबगीनें आंत धांवल्या नि काड्यांची पेटी घेऊन आल्या. आम्हीं सिगरेट पेटवत असतांच दामले वापटाला म्हणाले, 'पण मि. वापट, हे कांही खरं नाहीं. गोल्डफ्लेक ओढतां नि काड्याची पेटी कसली वापरतां ? खरं म्हणजे लायटर वापरायला हवाय तुम्हीं झकासपैकी !' यावर वापट नुसता हंसला. पण सासूबाई मात्र पटकन् म्हणाल्या, 'हां ना, मी तेच म्हणते. ते कांहीं नाहीं, मीच आता दोघा जांवयांना दोन चांगल्यापैकी लायटर कां काय म्हणालास ते घेऊन देणार आहे !'

आतां मात्र मी विजयोन्मादानें धुंद झालो होतो. कधीं नव्हे तो घरांत पत्ते खेळत होतो, तेही सासुबाईंनी आणून दिलेले. कधीं नव्हे तो घरांत तंगड्या पसरून रुबाबांत सिगरेट फुंकत होतो. तेही सौ. च्याच समोर नव्हे, सासुबाईंच्या समोर. मी सारखा धुम्रवलयं सोडण्याचा प्रयत्न करीत, मधल्या दारांत उभ्या असलेल्या सौ. कडे बघितलं. ती माझ्याकडे पाहून कौतुकानें हंसत होती. तिनें पांढरं निशाण फडकवलं होतं. तिच्या पक्षानें शरण-गति पत्करली होती. मी विजयी झालो होतो. माझा मोठा विजय झाला नि अशा रीतीनें एक महा(न) युद्ध संपुष्टांत आलं होतं.

•••








अभिनयकलेच्या प्रतिष्ठेस जपणारा लौकिकवान् अभिनेता



# स्पेन्सर ट्रेसी

—के. टी. देशमुख

**हालिवूडच्या** चित्रपट-सृष्टींत एक वैभवशाली असा कालखंड ज्यांनीं उभारला, आपल्या मनोहर कर्तृत्वानें भूषविला अशा प्रतिभाशाली, कलानिपुण, कर्तबगार अभिनेत्यांच्या मालिकेंत स्पेन्सर ट्रेसी ह्या चित्रताऱ्याचें नांव मोठ्या गौरवानें घेतलें जातें. वयाची साठी ओलांडलेला हा वृद्ध आणि अनुभवसमृद्ध कलावंत तीसपसतीस वर्षें चित्रतारा म्हणून चमकतो आहे.

दर्शनानें पोलादी, अन्तःकरणानें मृदु, शान्त, गंभीर, वागणुकीनें काटेकोर, शिस्तबद्ध, अतिनम्र आणि विनयशील असा हा कलावंत पडद्यावरून प्रसन्न असें स्मितहास्य करीत पाहूं लागला कीं, मूर्तिमंत सौजन्यच समोर उभें ठाकलें आहे असें वाटतें. त्याच्या डोळ्यांमधील प्रखर बुद्धिमत्तेची जाणीव होते आणि आदरयुक्त अशा स्नेहल भावना प्रेक्षकांच्या अन्तःकरणांत निर्माण होतात.

या त्याच्या स्वभावगुणविशेषांशीं मिळत्याजुळत्या भूमिका वठविण्याची संधि त्याला जेव्हां जेव्हां प्राप्त झाली तेव्हां ते चित्रपट त्यानें खूप गाजविले. अधिकारानें श्रेष्ठ, कर्तव्य कठोर, न्यायनिष्ठुर परंतु दुसऱ्याच्या न्याय्य हक्काबद्दल सदैव जागरूक रहाणाऱ्या अशा थोर व्यक्ति पडद्यावर समर्थपणानें उभ्या करणें त्याला फार आवडतें आणि जमतेंहि! त्यांत त्याच्या सूक्ष्म निरीक्षणाची आणि अभिनयकौशल्याची भर पडली म्हणजे त्या भूमिका प्रभावी होतात—अजोड ठरतात!

'कॅप्टन करेजस्' आणि 'बॉईज् टाऊन' या दोन संस्मरणीय अशा चित्रांतील त्याच्या भूमिकांस हॉलिवूडच्या अकादमीनें १९३७ आणि ३८ सालीं 'ऑस्कर' बहाल केले! एका अभिनेत्यानें लागोपाठ सतत दोन वर्षें हें पारितोषिक मिळविण्याचा हा एकच अपवाद.

मला हा कलावंत आवडतो तो त्याच्या मनोरम भूमिकांसाठीं हें तर खरेंच. परंतु चित्रपटांत तो ज्यावेळीं समोरच्या पात्रांचे संवाद ऐकतांना दिसतो तीं दृश्यें मला विलोभनीय वाटतात. त्या पात्रांकडे तो किती तन्मयतेनें अगदीं त्यांच्या भावनांशीं समरस होऊन पहात रहातो! त्याच्या चित्रांचें महत्वाच्या प्रसंगीं – चित्रिकरणहि बेटें अशा खुबीनें घेतलेलें असतें कीं, संभाषण ऐकतांना वा बोलतांना पडद्यावर तो एकसारखा दिसत रहावा. आपले संवाद इष्ट त्या अभिनयासुद्धां तो बोलतच असतो. परंतु दुसऱ्या पात्रांचे संवाद चालू असतांना तो त्यांना आपल्या सहानुभूतीनें ओथंबलेल्या अशा मूक अभिनयानें जो प्रतिसाद देतो त्यानें खूप मजा येते.

'जज्जमेंट अॅट न्यूरेन्बर्ग' हें त्याचें अलीकडचें चित्र गतवर्षी मुंबापुरी गाजवून गेलें.



मेट्रो गोल्डविन कंपनीच्या 'नॉर्थ वेस्ट पॅसेज' या चित्रपटांत स्पेन्सर ट्रेसी आणि क्लेअर ट्रेव्हर.



सावर स्वतःला !

उडी घतो....
सावर डोळ तुझ !
झेप घतो..
आवर हसूं तुझे !
उडवीत असे..खुणवीत असे
थोडे मिटून..थोडे बघून
यायचें तुला—
जमलें आहे—
हसत डोळ्यांतून !
ओठ चाळवून..थोडे थांबून
मग उकलून..मग मिटून
हसायचें तुला—
जमलें आहे—
हलक्या पाऊलांतून !
हा संग तुझा !
निःसंग ग राहवत नाहीं !
रंग भरून उधळल्यावर
अंग आमचें
बहर आवरत नाहीं !
झेप घेतो..
आवर लय—वलयें तुझीं !
उडी घेतो..
सावर चाल—फुलं तुझं' !

—भास्कर कविमंडन

दुसऱ्या महायुद्धांत जर्मन राष्ट्राचा पाडाव झाल्यानंतर गोबेल्स गोअरिंग इ. पहिल्या क्रमांकाच्या युद्ध गुन्हेगारांवर खास खटला चालविण्यांत येऊन त्यांना मृत्यूची शिक्षा फर्मावण्यांत आल्यानंतर न्यूरेन्बर्ग येथें एक वैशिष्ट्यपूर्ण असा खटला अमेरिकेचे जज्ज डॅनिअल हेवूड ह्यांच्यासमोर उभा राहिला. आरोपी कुणी लष्करी अधिकारी नव्हते तर पराजित जर्मन राष्ट्रामधील चार न्यायाधीश होते. न्यायाधीशांच्या पुढे चालणाऱ्या या खटल्यांत आरोपी म्हणून न्यायाधीश आरोपीच्या पिंजऱ्यांत उभे असल्यानें या अपूर्व घटनेस जागतिक महत्व आलें. लष्करी कारवाई करणाऱ्या सेनाधिकाऱ्यांना युद्धगुन्हेगार मानणें योग्य. परंतु मुलकी सनदी अधिकारी युद्धगुन्हेगार ठरूं शकतात काय असा महत्वाचा प्रश्न होता. या आरोपींना दोषी ठरविण्यांत येऊन जर शिक्षा दिल्या गेल्या तर जर्मन देश राष्ट्र म्हणून पुढें चालविण्यास जर्मन नागरिकांचा हक्क हिरावल्यासारखें होईल. अशा धास्तीमुळें जर्मन आरोपींचा जर्मन वकील जीवापाड परिश्रम करीत होता.

खटल्याचा निकाल देतांना जज्ज हेवूड चारहि आरोपींना दोषी ठरवून जन्मठेपेची शिक्षा सुनावतो.

स्पेन्सर ट्रेसीनें रंगविलेली जज्ज हेवूड ही भूमिका त्याच्या आजवरच्या भूमिकांमध्यें श्रेष्ठ मानली गेली. कोमल आणि कठोर भावना संयमपूर्ण अशा अभिनयकौशल्यानें वठविण्याचें त्याचें कसब रसिक मनांस मोह पाडणारें आहे. ज्यू नागरिकांना सरसकट पकडून तुरुंगांत टाकीत आहेत अशी सर्वसामान्य जर्मन नागरिकांची समजूत. इतक्या अमानुषपणानें लक्षावधि ज्यूंची कत्तल होत आहे याची गंधवार्ताहि त्यांना नव्हती असा शोध जज्ज हेवूड मोठ्या हळुवारपणानें घेतांना दिसतो. सामान्य जर्मन नागरिकाबद्दल त्याच्या मनांत सहानुभूति आहे. परंतु ह्या भीषण हत्याकांडाला कायद्याचें शिक्कामोर्तब करणाऱ्या न्यायसत्तेच्या अधिकाऱ्यांना खंबीरपणानें दोषी ठरवून शिक्षा ठोठावल्या!

न्यायालयांतील गंभीर आणि खळबळजनक कामकाजानें हा चित्रपट भरलेला आहे. अशा गुंतागुंतीच्या राजकीय पार्श्वभूमीवर चित्रपट तयार करणें ही फार मोठी जोखीम आणि जबाबदारी होती. शिवाय पात्रे अनेक, प्रत्येक पात्र महत्वाचें. रंगतीच्या दृष्टीनें प्रत्येक भूमिका उठावदार हवीच परंतु सगळ्या भूमिकांचा मध्यबिंदु असलेली जज्ज हेवूड ही भूमिका सर्वांत वजनदार झाली तरच चित्रपट यशस्वी होणार! या चित्रात्री पात्र योजना म्हणजे चित्रताऱ्यांची आणि तारकांची एक भली मोठी मालिकाच होती. स्पेन्सर ट्रेसी, बर्ट लॅंकॅस्टर, रिचर्ड वुइडमार्क, मॅक्झी मिलन शेल, मॉंटगोमरी क्लिफ्ट, मार्लिन डिट्रिच आणि ज्यूडी गार्लंड ह्यांतील एखादें नांव देखील सर्वसाधारण चित्रपट यशस्वी होण्यास पुरें होतें!

हा चित्रपट जेव्हां पुरा झाला त्यावेळीं त्यांत चमकलेले कलावंत तंत्रज्ञ आणि कांहीं पाहुणे मंडळी यांच्या समवेत त्याचा एक खास प्रयोग करण्यांत आला. या प्रसंगीं स्पेन्सर ट्रेसीनें निर्माता दिग्दर्शक स्टॅन्ले क्रॅमर ह्या तरुण पिढीतील महत्वाकांक्षी कलाकाराचें कथाविषयाच्या धाडसाबद्दल अभिनंदन केलें. त्याच्या अचाट परिश्रमांची आणि दिग्दर्शन कौशल्याची स्तुती करून त्याची पाठ थोपटली. चित्रपटाच्या सर्व तांत्रिक बाबी निर्दोष असल्याचा निर्वाळा दिल्यानंतर सहकारी कलावंतांच्या भूमिका अप्रतिम वठल्या आहेत हें सांगतांना त्याचा स्वर गदगदून आला. त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले.

त्यानें सांगितलेल्या सर्व गोष्टी खऱ्या होत्या हें पुढें काळानेंच सिद्ध केलें! त्यानें केलेला गौरव यथायोग्य होता. परंतु त्यानें स्वतः वठविलेली जज्ज हेवूड ही भूमिका सर्वांत प्रभावी आहे असें दिग्दर्शक स्टॅन्ले क्रॅमरनें म्हणतांच त्यानें लगेच विषय बदलला. स्वतःची स्तुती ऐकतांच तो लज्जित होतो—अगदीं ओशाळगत होतो. दुसऱ्यांच्या कलागुणांचें योग्य कौतुक करतांना मात्र त्याला आनंदाचें भरतें येतें!

सहकारी कलावंताच्याबद्दल कळकळ आणि सद्भावना बाळगणारा हा अभिनेता वक्तशीरपणाबद्दल तेवढाच प्रसिद्ध आहे. स्टुडिओंत तो सकाळीं ठीक साडेआठला हजर असतो. सायंकाळीं साडेपांचला तो घरीं जाण्यास निघतो. काम पुढें चालूं रहाणार असलें तर त्याची थांबावयाची तयारी नसते असें नाहीं. परंतु चित्रिकरणाचें काम ठरविल्यापेक्षां जास्तीच पदरांत पडलें असा दिग्दर्श-

काचा नित्याचाच अनुभव असतो. सकाळीं सेटवर येण्यापूर्वी त्याची संवादाची नक्कल तोंडपाठ झालेली असते. आपल्या चोख पाठांतराबद्दल स्पेन्सर ट्रेसीला नेहमीं अभिमानसुद्धां वाटत असतो. त्यामुळें चित्रिकरणास विलंब असा लागतच नाहीं. दिग्दर्शकाला त्याला विशेष असें एकसारखें कांहीं सांगावें लागत नाहीं. प्रारंभीच्या एकदोन सूचना पुरेशा होतात. भूमिकेचा आत्मा त्यानें अचूक हेरलेला असतो. आपल्या सहजसुंदर आणि संयमपूर्ण अशा अभिनयानें चित्रिकरणांत तो असा कांहीं रंग भरावयास सुरुवात करतो कीं सेटवरची सारी मंडळी अगदीं भारावून जातात!

त्याच्या प्रवेशाचें चित्रिकरण चालू असतांना त्याचा शॉट पुन्हां कधीं घ्यावा लागत नाहीं! क्वचित प्रसंगीं दुसरा 'टेक' घ्यावयाचा आहे अशी दिग्दर्शकाची सूचना झाल्यास, ओठांचा चंबू करून खूप आश्चर्य वाटतें आहे असा विशेष अभिनय करीत तो 'कॅमेरामन'कडे आणि 'साऊंड रेकॉर्डिस्ट असिस्टंट'कडे पहात रहातो! त्यामुळें पुढच्या खेपेस त्याचे शॉटस् घेतले जात असतांना कांहीं तांत्रिक चूक न होऊं देण्याची खबरदारी आपोआप घेतली जाते.

त्याच्या अभिनय पद्धतीची एक आणखी मौज आहे. त्याचे शॉटस् घेतले जात असतांना स्वारी कांहीं तरी कृत्रिम अवसान, डामडौल, नटवेपणा कधीं करणार नाहीं. त्याचा अभिनय स्वाभाविक आणि सहजसुन्दर असा असेल. शॉट चालू असतांना तो केव्हां डोकें खाजवील, कधीं चष्मा हातांत काढून त्याची काडीच तोंडात घेईल किंवा डोकें चक्क टेबलावर टेकील आणि त्यावेळीं कॅमेरा त्याच्या शुभ्र केंसावर केंद्रित झाला असेल! पडद्यावरती या सर्व क्रिया रंगतींत खूप भर टाकतात यांत मात्र संशय नाहीं!

तरुणपणीं मेडिकल कॉलेजमध्यें शिक्षण घेत असलेला स्पेन्सर ट्रसी पुढें 'डॉक्टर' होण्याचीं स्वप्नें पहात होता. परंतु विधियोजना निराळीच होती. काळाला पुढें जो खेळ करावयाचा असतो त्याची योजना तो अगोदरपासूनच सुसूत्रपणानें आंखीत असतो.

☆ ☆ ☆

अमेरिकेतल्या मिल्वाकी गांवीं जॉन ट्रेसी आणि कॅरी ब्राऊन ट्रेसी या पांढरपेशा सुखवस्तु कुटुंबांत त्याचा जन्म ५ एप्रिल १९०० ला झाला. फारा दिवसांनीं झालेल्या या अपत्याचें संगोपन मातापित्यांनीं फार मोठ्या हौसेनें आणि उमेदीनें केलें. उच्च शिक्षणासाठीं तरुण स्पेन्सरला त्यांनीं १५० मैलांवरील रिपन मेडिकल कॉलेजमध्यें पाठविलें.

कॉलेजमधील वक्तृत्वाच्या चढाओढींत तो नेहमीं ईर्षेनें भाग घेई. एकदां त्याचें भाषण ऐन रंगांत आलें असतांना कॉलेजचा नाट्यविभागाचा शिक्षक तेथें सहज आला. स्पेन्सर ट्रेसीच्या आवाजावर आणि आवेशावर तो एकदम लुब्ध झाला. कॉलेजच्या वार्षिक स्नेहसंमेलनप्रसंगीं विद्यार्थी विद्यार्थिनींचें जें एक नाटक करून दाखवावयाचें होतें त्यांत स्पेन्सरला प्रमुख भूमिका मिळाली. नाटक तुफान यशस्वी झालें. स्पेन्सरच्या भूमिकेचा फार गवगवा होऊं लागल्यावर येथून पुढचें आयुष्य रंगदेवतेच्या सेवेंतच रुजूं करावयाचें असा निश्चय करून तो न्यूयॉर्कला आला. 'अमेरिकन अॅकॅडमी ऑफ ड्रॅमॅटिक आर्टस्' या मान्यवर अशा संस्थेंतून त्यानें नाट्यशिक्षणाचे पाठ मनापासून गिरविले. रंगभूमीवर प्रथम लहान सहान भूमिका केल्यानंतर न्यूयॉर्क शहरांतील ब्रॉडवे रंगमंदिरात १९३१ सालीं 'लास्ट माईल' या नाटकांत त्यानें नायकाची भूमिका केली. ही भूमिका अप्रतिम झाली आणि स्पेन्सर ट्रेसी एकदम आघाडीवरच्या कलावंतांत गणला गेल्याबरोबर हॉलिवूडचें लक्ष या नवताऱ्याकडे वेधलें. खास निमंत्रणावरून तो हॉलिवूडला येऊन दाखल झाला आणि पहिल्या एकदोन चित्रानंतर रुपेरी पडद्यावरील चित्रताऱ्यांच्या फडांत समाविष्ट झाला! 'मेट्रो गोल्डविन' या श्रेष्ठ चित्रसंस्थेंत त्यानें आपली उमेदीची



हौरी....

कुठें काय...कुठें काय....
काय सांगूं गडे
चोरूनीच हात कधीं
गळ्यामधीं पडे....
कांहीं नाहीं...कांहीं नाहीं...
काय सांगूं बाई
तशी मुळीं खाशी भेट
घडलीच नाहीं....
इथें तिथें रानोमाळ
पाहुण्यांचे थवे
रात्र सारी टपलेले
आगलावे दिवे
तरीपण....तरीपण
सांगायची चोरी
परसांत उजाडेतों
खेळलों ग हौरी....

—सौ. अंजलि ठकार

पहिली वीस वर्षे काढलीं. अलीकडे तो स्वतंत्रपणानें बाहेर कुठेंहि कामें स्वीकारीत असतो. त्याच्या जुन्या चित्रांमध्यें बूम टाऊन, टेस्ट पायलट, सानफ्रान्सिस्को, स्टॅन्ले अँड–लिव्हिंग्स्टन, कास टिंबरलेन हीं चित्रे विशेष गाजलीं. अलीकडच्या चित्रांत डव्हिल अॅट फोअर ओ क्लॉक, इटस् ए मॅड मॅड वर्ल्ड, इन्हेरिट दि वुइंड हीं चित्रें विशेष प्रसिद्ध आहेत.

☆ ☆ ☆

रंगभूमीवर लहानसहान भूमिका करीत असतांना १९२३ सालीं त्यानें आपला विवाह 'लुई ट्रेडवेल' या अभिनेत्रीशीं केला. लग्नानंतर रंगभूमीचा त्याग करून ती संसारांत रमली. त्यांना दोन अपत्यें झालीं. मुलगी 'सूझी' आणि मुलगा 'जॉन'

जॉन ही ह्या सुखी दांपत्याची शोकान्तिका ठरली.

दुर्दैवानें हा मलगा जन्मापासून ठार बहिरा निघाला. चित्रतारा म्हणून स्पेन्सर ट्रेसीला अमाप पैसा मिळूं लागला होता. जॉनच्या उपचाराकरितां त्यानें पाण्या-

सारखा पैसा खर्च केला. सर्वसाधारण माणूस इतका पैसा कुठून आणणार? ट्रेसी दांपत्यानें लॉस एंजेल्स येथें 'जॉन ट्रेसी क्लिनिक' म्हणून एक मोठा धर्मार्थ दवाखाना उघडला. लहान मुलांच्या आजारांवर तेथें थोडक्या खर्चात औषध योजना होत असते. आपल्या फावल्या वेळीं दोघेहि अजून या दवाखान्याच्याच विस्तारांत दंग असतात. कौटुंबिक आपत्तीमुळें हें कुटुंब समाजांत मिसळेनासें झालें तें कायमचेंच. हॉलिवूडच्या सुप्रसिद्ध अशा मोठमोठ्या हॉटेलांतून होणाऱ्या मेजवान्या आणि नृत्यसमारंभांत ट्रेसी कधींहि सामील झाला नाहीं. 'चित्रतारा' म्हणून आपल्या खाजगी आयुष्यांतील डामडौलाचीं छायाचित्रें प्रसिद्धीसाठीं म्हणून देण्याचें त्यानें सुरुवातीपासून टाळलें आहे.

चित्रतारे आणि चित्रतारका आपल्या प्रसिद्धीसाठीं निष्णात जाहिरातपटूची वैयक्तिक स्वरुपांत नेमणूक करतात. स्पेन्सर ट्रेसीनें अशी कुणाची नेमणूक आजतागायत केव्हांच केली नाहीं. कलावंत पडद्यावरच्या भूमिका इमानदारीनें चोख वठवीत राहिला तर त्याच्या अभिनय कौशल्याची तारीफ करावयासाठीं म्हणून आणखी कांहीं प्रसिद्धीची मुळींच गरज नाहीं अशी त्याची विचारसरणी असल्यानें, वेगवेगळ्या पोझेस घेतलेला स्पेन्सर ट्रेसी वृत्तपत्रांत अगर मासिकांत कुठें दिसला नाहीं. तरीदेखील चित्ररसिकांच्या अन्तःकरणाची पकड तो आजतागायत कायम ठेवूं शकला.

'जज्जमेंट ॲट न्यूरेन्बर्ग' हें त्याचें सत्तरावें चित्र आहे. चित्रव्यवसायांत त्याची पत फार मोठी आहे. हॉलिवूडमधील बीव्हर्ली हिल्समधील त्याच्या बंगल्यावर चित्रविषयक करारमदार करावयास उत्सुक असणाऱ्या निर्मात्यांची सतत रीघ लागलेली असते. आपल्या चित्रपटांत त्यानें भूमिका स्वीकारावी म्हणून निर्माते आपापल्या कथा पटकथा घेऊन त्याच्या अभ्यासिकेच्या दाराशीं तिष्ठत बसलेले असतात. तर मग ह्या पांचसात वर्षांत पडद्यावरील त्याचें दर्शन दुर्मिळ कां झालें ?

चित्रपट धंद्याचें अलीकडचें बदलतें रूप त्याला मंजूर होत नाहीं. प्रेमाच्या बाष्कळ कथा त्याच्यासमोर आल्या कीं त्यांत भूमिका करणें तर दूरच परंतु त्या वाचतना सुद्धां मनाला होणारा उद्वेग लपवितां येणें अशक्य होतें. मग कथानकाच्या चोपड्या भिरकावून देतांना तो म्हणतो, "तुमच्या या कथांतून नायकाची भूमिका वठवितांना माझी नात शोभेल अशा कोंवळ्या वयाच्या नटीबरोबर कां आतां मी प्रेमाचा अभिनय करीत बसावें ? तरुणपणीं मिळेल ती भूमिका मी स्वीकारीत गेलों. कांहीं भूमिका मी करावयास नको होत्या हें नंतर मला पटलें. एके दिवशीं रंगदेवतेपाशीं मी अशी शपथ घेतली कीं, माझ्या मनास रुचेल पटेल अशीच भूमिका मी स्वीकारीन!"

निर्माते करार करतात, प्रेक्षक विनतक्रार पहातात. या भांडवलावर पैसा ओढीत राहाण्याचें त्यानें निग्रहपूर्वक टाळलें आहे. 'चित्रें स्वस्त झालीं!' 'धंद्याची पातळी खालच्या थरावर आली!' 'लोकांना स्वस्त करमणूकच हवी आहे!' अशी बोंबाबोंब करीत पुन्हां त्यांतच घोंटाळत रहाण्याचा ढोंगीपणा त्याला जमला नाहीं. आणि म्हणूनच हल्लीं केव्हांतरी एखाद्या चित्रांमधून आपणांस त्याचें दर्शन घडतें!

• • •

["छायाचित्रें मेट्रो गोल्डविन मेअर आणि कोलंबिया पिक्चर्स या चित्रसंस्थांच्या सौजन्यानें"]

# सिनेमांतल्या "सिली" कथा

## पँट फाटली

"शहनाई" या चित्रपटाच्या सेटवर तंग पेहरावांत "ट्विस्ट" नृत्य करतांना जॉनी वॉकरची पँट टर्रकन फाटली तेव्हां जॉनी म्हणाला, या तंग पेहेरावांत नाचतां येणं कठीणच !"

"कठीण काय आहे ? माझ्याकडे पहा जरा माझा पेहराव तुझ्याहून अधिक तंग असून देखील या पेहरावांत मी चांगल्या प्रकारें नाचूं शकतो." प्रवीण चौधरी जॉनीला म्हणाली.

"अग् पोरींची गोष्टच वेगळी आहे. पोरींच्या बाबतींत नृत्याच्या वेळीं पेहराव जितका तंग असेल तितकी त्यांच्या अंगाची हालचाल चटकन् होते. आणि पेहराव देखील त्यांच्या शरीराला अगदीं चिकटून बसतो. पण आम्हां पुरुषांशीं मात्र तंग पेहराव इतका प्रामाणिकपणा दाखवित नाही खरा" जॉनी वॉकर म्हणाला.

## पुन्हां वाचन

दारुबंदी शिथिल झाली हे समजतांच आगा हा विनोदी नट म्हणाला, "बरं झालं बुवा ! दारुबंदीची अंमल बजावणी सुरू झाल्यानंतर मद्यपानाच्या दुष्परिणामांविषयीं इतकं कांहीं साहित्य वारंवार प्रकाशित होत होतं कीं ते साहित्य वाचून बऱ्याच चित्रव्यवसायी मंडळींनीं वाचनच सोडून दिलं होतं. आतां ते निर्धास्तपणें पुन्हां वाचनाकडे वळूं शकतील."

## "दि एण्ड"

"विवाह म्हणजे जीवनाचा शेवट." असे विचार नवोदित अभिनेता सुधीर यानें प्रकट केले आहेत. तो म्हणतो, विवाह चित्रपटाच्या तीन अवस्था असतात. पहिली भेट ही पहिली अवस्था. प्रेम ही दुसरी अवस्था आणि विवाह ही तिसरी अवस्था. या अवस्थेनंतर "दि एन्ड" ही पाटी पडद्यावर येते. माझ्या जीवनरुपी चित्रपटांत ही पाटी झळकूं नये म्हणून चित्रपटांतील ही तिसरी अवस्था मी टाळली.

## मी सुंदर नाहीं

स्वतःच्या सौंदर्याचे गोडवे गाण्यांत बहुतेक चित्रपटतारका मोठे भूषण मानतात. पण शर्मिला टागोर ही बंगाली नटी मात्र याला अपवाद आहे. "काश्मीर की कली" या चित्रपटांतील नायिकेच्या भूमिकेसाठीं तिला विचारण्यासाठीं निर्माते-दिग्दर्शक शक्ति सामंता जेव्हां प्रथम तिच्याकडे गेले तेव्हां प्रथम तिनें शक्ति सामंताना सांगितले, "मी सुंदर नाहीं ही गोष्ट लक्षांत घेऊन मगच या भूमिकेसाठीं माझी निवड करायची कीं नाहीं ठरवा."

—सदानंद चेंदवणकर

अनुक्रमणिका








....भारावल्यासारखा तो बोलत होता....'एकाद्या वेळीं तिथें देह ठेवावा लागला, तर नक्कीच, पुन्हां इथेंच, या देशांतच जन्म घेईन. पुनर्जन्म मिळेल मला.' त्याचा चेहरा लालबुंद दिसत होता. "पुनर्जन्म ?" आपण खो खो हंसलों होतों....




—आनंद वर्टी

**धाड्कन्** मोटारीचं दार लोटून, कुलूपहि न लावतां कर्नल जाधव तसेच धांवत पळत परांजपे प्रसूतिगृहाच्या पायऱ्या पटापट चढून वेटिंगरूममध्यें आले. समोरून येणाऱ्या त्यांच्या नोकरानें ठोकलेल्या सलामाकडे दुर्लक्ष करून घाईघाईनें त्यांनीं विचारलं,

"कुठें ठेवलंय् बाईसाहेबाना?"

"वर साहेब, पहिला मजला, पांचवी खोली."

त्याचं वाक्य संपण्याआधीच ते घाईनें धाड्धाड् जिना चढून वर गेले. त्यांच्या पाठीमागून पळत येणाऱ्या त्या नोकराला तितक्यातच धाप लागली.

पांच नंबरच्या खोलीच्या दारावरचा हिरवा पडदा सरकवून ते आंत आले.

पलंगावर कुणीहि नव्हतं. त्यांची आई शेजारच्या खुर्चीवर सचिंत होऊन बसली होती. मुलगा आल्याचें पाहातांच त्यांना दिलासा मिळाल्यासारखं वाटलं असावं. सांवरून बसत त्या म्हणाल्या,

"तुझीच वाट पाहात होत्यें".

"जानकी कुठें?" जाधवांचा श्वास जड भासत होता

"आत्तांच तर घेऊन गेलेत. इथें येताना किती त्रास झाला म्हणून सांगू. टॅक्सींत घालून आणताना पुरेवाट झाली. इथें आल्यानंतर पलंगावर जी कोसळली ती पुढें बोलेच ना." राधाबाईंचा गळा भरून आला.

"किती वेळ झाला?"

उत्तराऐवजी राधाबाईकडून नुसते हुंदकेच ऐकूं आले. झालेला आघात त्यांना सहन करणं कठीण जात असावं.

"सांग ना आई, असं कां करतेस ?" तिचं सांत्वन करीत जाधव म्हणाले, "ठीक आहे ना?"

"तिची शुद्ध गेलीय् जगू. पलंगावर पडतांच डोळे वटारून हातपाय ताठ केलेन् तिनें. माझ्यानं पाहवलं नाहीं. कोंवळी पोर बिचारी. किती म्हणून पीडा." एकदम दोन्हीं तळव्यानीं डोळे झांकून घेत त्या म्हणाल्या, "माझ्यानें हें सहन करवत नाहीं. जगू."

आईची ती असहाय्य उद्विग्नता पाहातांच कर्नल जाधवांच्या छातींत धडकी भरली. पायांतून विजेचा लोळ सर्कन् चमकून गेल्याचा भास झाला आणि त्यांचं तोंड पार उतरलं. जवळच उभ्या असलेल्या हॉस्पिटलच्या नोकराला बोलावून त्यानीं विचारलं,

"पेशंट कुठें आहे?"

"आंत साहेब, स्पेशल् वॉर्डमध्यें."

"कधीं नेलं?"

"आत्तांच. पांच एक मिनिटं झालीं असतील साहेब."

"डॉक्टर कोण आहेत?"

"थोरले डॉक्टरच आहेत साहेब. त्यानींच पेशंटला आणायला सांगितलं."

जाधवनीं एक सुस्कारा सोडला. डॉक्टर परांजपेच आहेत म्हणून समजल्यानंतर विशेष काळजी करण्याचं कारण नव्हतं. एक अत्यंत नाणावलेले प्रसूतितज्ञ व शस्त्रवैद्य म्हणून त्यांनी ख्याती होती. त्यांच्या कौशल्यावर विसंबून तर त्यांनीं आपल्या सौभाग्यवतीचं नांव तिथं रजिस्टर केलं होतं.

"आई, आलोंच मी. काळजी नको करूंस. परांजपेच आहेत." असें सांगून ते स्पेशल् वॉर्डकडे त्वरेनें निघाले.

स्पेशल् वॉर्डचं दार बंद होतं. दारावरचा हिरवा पडदा मात्र चौपाटीवरून येणाऱ्या वाऱ्यानें फडफडत होता. व्हरांड्यावरच्या लाकडी कठड्याला टेकून ते उभे राहिले. आंतून खण् खण् असा आवाज ऐकूं येत होता. मधेंच कसलीतरी कुजबूज. त्यानंतर दीर्घ सुस्कारा सोडल्याचा आवाज. औषधाच्या उग्र वासानें सारें वातावरण भारून टाकलें होतें. उष्म्यानें अगोदरच जीव नकोसा होत होता. त्यांत तो वास त्याचा मस्तकशूळ उठवूं लागला. आतुरतेनें दाराकडेच पाहात उभे असतांनाच अचानक दार उघडलं गेलं. जाधव एकदम पुढें सरकून पाहूं लागले.

कुणीतरी एक नर्स हातांत ॲनामिलचं पांढरं भांडं घेऊन, जाधवांकडे दृष्टिक्षेपहि न टाकता घाईघाईनें टक् टक् टक् बूट वाजवीत ऐटीनें निघून गेली.

"हॅलो ऽ मिस्."

उत्तर देणं राहिलंच, पण जाधवांकडे तिनें ढूंकूनहि पाहिलं नाहीं.

"वा भलतीच उर्मट दिसतेय्" मनांतल्या मनांत ते म्हणाले. त्यांच्या हाताखालचे कुणी जर असे वागले असते तर तिथेच त्यानीं दोन मुस्कटांत ठेऊन दिल्या








असत्या. असा अपमान त्यांनी कधीं सहन केला असता का? त्या यःकश्चित नर्सच्या उद्दटपणानं त्यांचं मिलिटरी रक्त तिथल्या तिथें सळसळूं लागलं. 'येऊं दे तर परत, सांगतों तिला' असं मनाशींच म्हणत पुन्हां कठड्याला ते टेकणार इतक्यांत एका ट्रे-मध्यें औषधाच्या कांही वाटल्या घेऊन घाईतच ती परत आली.

जाधवनीं मोका साधून तिला मध्येंच अडविलं आणि आपल्या कणखर आवाजाला आणखी धार चढवून विचारलं,

"डॉक्टर कुठं आहेत ? मला भेटायचंय्."

परंतु त्यांच्या त्या आक्रमक पवित्र्याकडे किंचित्‌हि लक्ष न देतां,

"डोंट डिस्टर्ब, पेशंट ईज सीरियस्" असं अधिकारवाणीनें बजावून चट्‌कन बाजूला सरकून, तिनें दार उघडलं, व आंत जाऊन घट्ट लावून घेतले.

राहिलेल्या ठिकाणींच आपण कोसळून पडत आहोंत असं जाधवना वाटूं लागलं. एका क्षणापूर्वीचा त्यांचा तो कणखरपणा, ती जरब, ती कठोरता सारं जागच्या-जागीच विरघळून गेल्यामुळें आपण अगदींच अगतिक, निर्बळ होत चाललों आहोंत असं त्यानां वाटूं लागलं. बंद दारावर दीनपणें एक नजर टाकून त्यानीं तिथून काढता पाय घेतला. जड पावलं टाकीत पांच नंबरच्या खोलींत येऊन त्यानीं खुर्चीवर अंग लोटून दिलं.

खोलींतील खिडकींतून दिसणारे चौपाटीचे दृष्य फार मनोहर वाटत होते. दाट निळ्या रंगाची ती अपार अथांग जलसंपत्ती गंभीरपणें समोर पसरली होती. धडाडणारा अंगार पोटाशीं घेऊनहि शांत मुद्रेने पहुडली होती. फिरायला आलेल्या लोकांचे थवे रेतीच्या रेशमी स्पर्शाचा आनंद घेत आरामशीरपणें आपल्या सुखसंवादांत मग्न होते. भेळपुरीवाल्यांच्या दुकानांवरच्या रंगीबेरंगी छत्र्यांमुळें त्या दृष्याला एक वेगळाच रंगतदारपणा चढलेला होता; आणि कुठूनसे कुणीतरी सोडलेल्या दोन पतंगांच्या फिकट जांभळ्या आकाशाच्या पडद्यावर होणाऱ्या लवचिक हालचालीमुळें साऱ्या प्रसंगाला जिवंतपणा प्राप्त झाला होता.

तें दृश्य पाहातां पाहातां जाधवाना हायसें वाटल. जिवात जीव आल्यासारखं वाटलं. आपण एवढे हळवे कसे झालों याचंच त्यानां आतां आश्चर्य वाटूं लागलं. शेजारच्या खुर्चीत त्यांची आई अजून हुंदके देत बसली होती. रडल्यामुळें लाल झालेले त्यांचे डोळे, नाक पाहातांच जाधवाना चीड आली.

"आई, हें काय बरं असं? तुझं रडं अजून संपत नाहीं कीं काय? सगळं कांही ठीक होईल. कांही नको काळजी करूंस."

आवाजांत पुन्हां आलेल्या त्या कठोरतेनं त्यांना स्वतःलाच बरं वाटलं. मध्येंच चुकलेली आपली नाडी पुन्हां मिळाल्याचं समाधान त्यांना झालं. थंडीनें काकडणाऱ्या माणसानें स्वतःचे हातच एकमेकांवर घासून ऊब आणण्याचा प्रयत्न करावा त्याप्रमाणें स्वतःच्या शब्दांनीच स्वतःला धीर देण्याचा ते प्रयत्न करूं लागले. 'सगळं कांही ठीक होईल'.. खरंच कां ठीक होईल?... खरंच का ठीक होईल ?

"डॉक्टरांनीं अजून एक महिना तरी जाईल म्हणून सांगितल होतं नाहीं का?" राधाबाई म्हणाल्या, "आजच हे असं होईल म्हणून ध्यानीमनींहि नव्हतं. आत्तांच चार वाजतां चहा घेऊन दिवाणखाण्यांतील कोचावर विणीत वसली होती. मी स्वयंपाकघरात आचाऱ्याला संध्याकाळच्या जेवणाचं सांगत होतें. बाहेर धप्‌कन् पडल्याचा आवाज आला म्हणून बाहेर येऊन पाहातें तर ही हातानें पोट घट्ट दाबून घेऊन गालीच्यावर आसवं गाळीत पडली आहे. मी मग उशीर केला नाहीं. शंकऱ्याला पिटाळले टॅक्सी आणायला; व तडक निघून इथें आलें. इथें पोचेस्तोंवर तिचा चेहरा काळानिळा दिसायला लागला होता; म्हणूनच मला जास्त भीति वाटते.."

"जाधव गंभीरपणें ऐकत होते.

"बायकांचं दुःख तुला काय समजणार

म्हणा. वाळंतपण म्हणजे त्यांचा जीवन-मरणाचा प्रश्न. सुखरूपणें निभावली तर पुनर्जन्म मिळाल्यासारखं. देवा, तुलाच लागलाय् भार."

कल्पनेनेंच देवाची मूर्ति डोळ्यांसमोर आणली असावी त्यांनीं. हात जोडून मनोमन नमस्कार केला. त्यानंतर एक दीर्घ सुस्कारा. आईकडेच पाहात बसलेल्या जाधवना आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. क्षणापूर्वी कातरतेनं पांढराफटक पडलेला त्यांचा चेहरा आतां परीसाचा स्पर्श झाल्यासारखा अचानकपणें बदललेला होता. कोणत्या तरी समाधानानं, दृढनिश्चयानं, श्रद्धनं तो फुललेला होता. देवावर ठेवलेल्या हवाल्यानं एवढा आधार वाटतो का? तर मग माझ्यासारख्या नास्तिकाला आधार देणारा कुणीच नाहीं, असंच नाहीं का? हा विचार त्यांच्या मनांत चोरपावलांनीं येऊन चुकचुकत गेला. भीति, घाबरणं हें त्यांना लहानपणापासून माहित नव्हतं. गोळ्यांचा नुसता पाऊस पडत असताना ब्रेनूगन्‌वरची पकड घट्ट करीत पुढें पाऊल टाकण्याइतकी निडर छाती त्यांच्यापाशीं होती. गेल्या महायुद्धांत त्यानीं दाखविलेल्या पराक्रमाच्या प्रसंगांना आतां मिलिटरींत दंतकथांचं स्वरुप आलं होतं. असं असूनहि जीवनांतील कांहीं नाजुक प्रसगांना सामोरं जायचं म्हणजे त्यांच्या छातीचे ठोके द्विगुणित होत असत एवढं मात्र खरं.

"सर."

त्यांनी मागें पाहिलं. हॉस्पिटलचा नोकर उभा होता. सलाम ठोकून तो म्हणाला,

"डॉक्टर साहेब बोलावताहेत."

ताड्‌कन्‌ उठून जाधव त्याच्यामागं चालूं लागले. स्पेशल्‌ वॉर्डच्या शेजारीच डॉक्टरांचं कॅबिन्‌ होतं. पलीकडे ऑपरेशन्‌ थिएटर. आपल्याला हा कुणीकडे घेऊन जात असेल याचा ते विचार करतात तोंच कॅबिनूचं दार उघडून, नम्रतेनं तो म्हणाला,

"साहेब बसले आहेत आंत."

कॅबिन्‌मध्यें पाऊल ठेवताना, पाय जरा लचकल्यासारखा वाटला तरी जाधवनीं तिकडे लक्ष न देतां पुढें होऊन डॉक्टरशीं हस्तांदोलन केले. चेहऱ्यांच्या स्नायूनीं मनाविरुद्ध रुंदावून एक उसनें हास्य प्रदर्शित केले.

"मिस्टर जाधव, केस जरा सिरीयस्‌ आहे." डॉक्टरांचा आवाज जरा खोल गेला होता. "त्याना ऑपरेशन थिएटरमध्यें ठेवले आहे. तयारी चालू आहे." सिगरेटीचा एक दमदार झुरका मारून डॉक्टर धुराच्या लोटात बुडून गेले. पांढऱ्या कपड्यांत समोर बसलेल्या डॉक्टरना पाहाताना ढगांवरून तरंगत येणाऱ्या एकाद्या देवदूतासारखे ते जाधवाना वाटले. बरेच दमलेले दिसत होते ते. कपाळावर घामाचे थेंब ओळीनें उभे होते. केस अस्ताव्यस्त झाले होते. धुरावर धूर सोडून थकवा घालविण्याच्या प्रयत्नांत असल्यासारखे ते दिसत होते.

"डॉक्टर आतां सारं तुमच्याच हातांत आहे." आवाजांत पुन्हां मार्दव आल्याचं लक्षांत येतांच जाधवना स्वतःशींच ओशाळं वाटूं लागलं.

"पण मिस्टर जाधव, एका बाबतींत मला तुमची अनुमति घ्यावी लागेल. म्हणूनचं बोलावलं तुम्हांला."

"काय?"

"शक्यतों प्रयत्न करीन. परंतु सारे उपाय थकले तर दोघांपैकीं एकालाच.. either the mother or the child..."

जाधवना आपल्या कानांत बंदुकीची गोळी घुसते आहे असं वाटलं.. either the mother or the child..." आई हवीय्?...का मूल हवंय्? कोण? कोण पाहिजे? हजारों फटाकड्या डोक्यांत एकाच वेळीं तडतडून फुटताहेत असं वाटल्यामुळें जाधवनीं आपलं डोकं गच्च धरून घेतलं.

आई पाहिजे? कां मूल? आजपर्यंत एवढ्या गंभीर प्रश्नाशीं त्यानीं कधींच सामना दिला नव्हता. बॉंबच्या वर्षावानें शत्रूची छावणी धडधडून पेटविणेंहि एवढें कठीण नव्हतें. काय सांगावं? कुणाला जीवदान द्यावं? जानकीला? कीं तिच्या मुलाला? तिचं मूल? माझंहि नाहीं का? माझ्या मुलाला जीवदान? हो. माझं मूल जगलं पाहिजे. परंतु त्याचा परिणाम काय होणार? जानकीनें डोळे मिटलेच पाहिजेत का? जानकी...माझी वायको...लाडकी सखी...इतकी वर्षं माझी जोडीदारीण बनून, माझ्या सुखदुःखांत सहभागी होऊन, आपल्या जिवाची माझ्यासाठीं कुरवंडी करणारी सहचारिणी... या जगाची ओळख नसलेल्या त्या माझ्या मुलासाठीं तिला मरावं लागणार का? कां? कां?

सिगरेटीचं शेवटचं थोटूक रक्षापात्रांत चुरगाळीत डॉक्टर उठून उभे राहिले...

"मिस्टर जाधव, आतां जास्त वेळ नाहीं. विचार करीत राहिलांत तर हातीं राहाणार नाहीं. मी चाललों आतां, फक्त तुमच्या उत्तराची वाट पाहातोंय्.."

हो, बोललंच पाहिजे आतां. कांहीतरी उत्तर दिलंच पाहिजे. काय सांगू? कुणाला विचारूं? कुणाला? अरे, हा तर तुझा स्वतःचा प्रश्न आहे. तूंच निर्णय घेतला पाहिजे. पत्नी पाहिजे कीं मूल?.. कोण? पत्नी वांचली तर मुलांना काय तोटा?.. छीः किती स्वार्थी विचार आहे हा...बापरे...किती क्रूर आहे मी...

"मिस्टर जाधव.."

"सेव्ह द मदर."

"थँक यू."

डॉक्टर निघून गेले. जवळच्याच खुर्चीवर जाधवनीं आपलं अंग लोटून दिलं. मऊ गादीची ती खुर्ची त्यांना दगडापेक्षां कठीण लागली. हजारों सुया शरीरांत बोचत आहेत असा त्याना भास होऊं लागला. त्यानीं डोळे गच्च मिटून घेतले.

वाळचाच्या ठेक्यात आपली छोटी पावलं टाकीत, पडत, उठत, मिस्किलपणें खुदुखुदू हंसत एक गुटगुटीत हंसरं बाळ कुठूनसं येऊन त्यांना बिलगलं. त्यांच्या दोन्हीं पायांना मिठी मारून आपला इवलासा हात नाचवीत बोबड्या बोलात त्यानां बोलावूं लागलं,

"बाऽ बाऽऽ"

भ्रम झाला कीं काय? अचानक जाग आल्यासारखं जाधवनीं डोळे उघडून पाहिलं. कुणीहि नव्हतं. त्यांच्या अंगाला घाम फुटला.

काय केलं मी? एका अज्ञात, अनामधेय जिवंत शिशूची हत्या करायला सांगितलं? कोणतं पाप घडलं माझ्या हातून आतां? उजेडहि न पाहिलेल्या एका निष्पाप, अननुभवी, फुलांपेक्षां कोंवळ्या जिवाला कापून काढावयास सांगितलं? काय अधिकार आहे आपल्याला ? बाप म्हणून कां? बाप कां? मुलाची हत्या करण्याकरितां? मिलिटरींत कवाईत चालू असताना वाजणारा ड्रम् त्यांच्या कानांत वाजूं लागला. बिगुलांतून येणार तुत्तुतूचा आवाज चढूं लागला. ढ्रं..ढ्रं..ढ्रं..रप्..रप्..रप्..रप्..लेफ्ट राइट्..लेफ्ट राइट्.. हातांत बंदुका घेऊन एका रांगेत, शिस्तीत चालणारी खाकी गणवेषांतील पलटण... फायर्..! आकाशाला तडा पाडणारी गर्जना... धडम्... धुडुम्... प्रथ्वीचा चेंडू फुटून चूर चूर होऊन गेल्याचा आवाज... "सेव्ह द मदर.. "थँक यू.." काय अधिकार आहे आपल्याला ? *'You have no right to take a life so long as you cannot duplicate a blade of grass.'*

तत्वज्ञानाचा प्राध्यापक असलेला आपला मित्र अय्यर नेहमी करीत असलेली ती पोपटपंची... पोपटपंची? छे! एका जिवाला वांचवितां येत नाहीं मला... मारायचं झालं तर मात्र.. घूंऽऽ असा आवाज करीत एक जेट् विमान आपल्या मस्तकांत घिरट्या घालूं लागल्यासारखं त्यांना वाटूं लागलं...

"जानकी, तुझ्यासारखाच दिसतोय् हं. ओठ तर हुबेहूब तुझेच. आतां तुझेच ओठ पाहिजेत असं नाहीं मला."

"चला, चावट कुठले...हंसतोय् पाहा कसा गुलाम, काय रे; तुला समजलं काय? अहो, याचं कपाळ बघा नं, अगदी तुमच्यासारखं आहे."

"नांव काय ठेवणार आहेस?"

"तुम्हींच सांगा नं."

"रणजित."

"कां, आतांपासूनच मिलिटरींत भरती करण्याचा विचार कीं काय? तें कांही नाहीं. बाळ माझा इंजिनिअर होणार; नाहींतर मोठा वकील होणार. नाहीं काय रे? बंदुकीची संगत नको हो त्याला."

"बरंय् बुवा, राहिलं आपलं. नांव तरी आपण काय ठेवणार आहांत कळेल कां?"

"यशवंत."

"अच्छा."

...जेवण झाल्यानंतर टॉवेलला हात पुसत आपण दिवाणखाण्यांत आलों होतों. पुस्तकांच्या सेल्फजवळ असलेल्या कोचांत जानकी बसली होती. पाठमोरी होती आपल्याला. चोरपावलांनीं आपण तिच्या पाठीमागें जाऊन उभे होतों. हातांतील सुयांच्या लयबद्ध हालचालीबरोबर तिच्या मांडीवरचा लोकरीचा पेंडू उशी घेत उलगडत होता. क्षणभर ती लय, त्या लयींत लागलेली तिची समाधी पाहून आपण मोहून गेलों होतों. स्तब्ध झालों होतों. मग एकदम म्हणालों होतों,

"ओऽ येणाऱ्या पाहुण्यांसाठीं जोरात तयारी चालविलेली दिसते."

जानकी दचकून उठल्यामुळें लोकरीचा चेंडू खाली पडून घरंगळत गेला. कोपऱ्यांत खेळणाऱ्या 'किटी' मांजरीनें मोका साधून तेवढ्यांत त्याच्यावर झडप घातली होती.

"किती घाबरलें मी".

जानकीचा चेहरा कां कुणास ठाऊक, कोमेजला होता. हातांतील सुया खाली ठेऊन आळस घालविण्याकरितां तिनें दोन्ही हात वर उचलून बोटं मोडलीं.

तिचे हात वरच्या वर पकडून, मग जरा वाकून मी.... पण जानकी प्रसन्न झाल्याचं दिसलं नव्हतं. गर्भवतीचं तेज तिच्या चेहऱ्यावर फुललं होतं तरी तो म्लान वाटत होता. देहावरच्या जबाबदारीचं ओझं सहन करणं कठीण जात असावं.

"असं का ग.."

"खूप भीति वाटतेय् हो.. काय होईल.."

तिच्या भीतीला एका फुंकरीनें उडवून लावल्याप्रमाणें हंसत आपण म्हणालों होतों, "छे, मी असताना तुला कसली भीति आलीय, वेडी कुठली. कांही नाहीं होत."

तिला जरा धीर आला वाटतं. आपले हात घट्ट पकडून, कुरवाळीत ती सौम्यपणें हंसली होती.

मी असताना तुला कसली भीति आलीय्? हो, आतांहि तिचं रक्षण करणं आपल्याच हातीं होतं नव्हे कां? कुणीतरी एका अनोळखी जिवानें तिच्या जिवावर संकट आणलं होतं. पण मी पडलों खंबीर.. गरीब बिचारी.. कोणत्या अनुभवांतून जात असेल ती? इथें जीवन तिथें मरण... एक क्षणहि

## अक्षरशः कवि !




" प्रौढत्वी निज शैशवास......" वगैरे काय काय आहे ना तसं यांचे अहे.... कवि आहेत ना ?








काळासारखा वाटूं लागला आहे. डॉक्टरहि जिवापाड मेहनत करीत असतील; सारी शक्ति पणाला लावून एका जिवाला वांचविण्याकरितां..मृत्यूशीं झुंज..त्या अगाध शक्तीपुढें आम्हीं कळसूत्री बाहुल्यासारखेच नाहीं का?..... अंधार... गुडुप अंधार... मिटलेले डोळे जानकीनें उघडले नाहींत तर नेहमींचाच अंधार... भयानक अंधार.. हि..हि: हि...... 'डेंजर' असं लिहिलेल्या पाटीवर काढण्यांत येणारी ती कवटी दांत विचकून, डोळे मोडीत, फिदीफिदी हंसत त्या अंधारांत विरत गेल्याचा त्यांना भास झाला...... बायकांचं दुःख तुला काय समजणार म्हणा. बाळंतपण म्हणजे जीवन मरणाचा प्रश्न. सुखरूपपणें निभावली तर पुनर्जन्म मिळल्यासारखं.....

पुनर्जन्म? हा शब्द कुठें तरी ऐकला होता खरा. कुठें बरं? हो...परवांच नाहीं का? इमर्जन्सी कमीशनसाठीं भरती करण्याकरितां तरुणांच्या मुलाखती घेत होतों ना. मी, लेफ्टनंट कर्नल मुकर्जी आणि कर्नल सिंग एकेकांना आंत बोलावून प्रश्न विचारीत होतों. येणारे युवक उत्साही, दमदार दिसत होते. जीवनाचा अजून पूर्वपणें उपभोग न घेतलेलेच दिसत होते. तारुण्याचा नुकताच स्पर्श झाल्यामुळें कांही जणांत बाल्यावस्थेंतील ओढाळपणाहि दिसत होता. उमलणाऱ्या त्या रंगेल तारुण्याच्या जोषानें मी पुलकित झालों होतों.

त्यांना प्रश्न विचारीत असतानांच एक विचार माझ्या मनांत चमकून गेला होता. आपण करतों आहोंत तें ठीक आहे ना? या कोंवळ्या युवकांच्या भविष्यांत लिहून तरी काय ठेवलेलं असेल? उत्तरसीमेवर गोळ्यांशीं सामना देताना यांतील किती जणांचे बळी जातील कुणास ठाऊक! फुलणाऱ्या फुलासारख्या यांच्या भविष्याला युद्धाच्या निखाऱ्यांवर भाजून काढणं कां माझ्या माथीं लिहिलंय्?.. या विचारांनी आपण त्या दिवशीं अस्वस्थ झालों होतो. कामांत लक्ष लागत नव्हतं.

कुणीतरी एक तरुण समोर येऊन बसला. कर्नल सिंगनीं कोणता तरी प्रश्न विचारला. चट्कन् त्यानें उत्तर दिलं. अजून कोंवळा होता तो. पण डोळ्यांत विलक्षण तेज होतं. ओठ पिळले तर दूध निघालं असतं; पण कमावलेले दंड व रुबाबदार खांद्यानीं त्याचं व्यक्तिमत्व भरदार दिसत होतं. माझं कुतूहल जागं झालं होतं.

"इथें येण्याची कां बरं इच्छा झाली तुला?"

"तें माझं कर्तव्य वाटलं सर," ताड्कन् त्यानें उत्तर दिलं.

"पण असं पाहा, तूं अजून लहान आहेस. अजून तुझं बरंच आयुष्य जायचंच आहे."

"तें तियं जाईल. एवढच ना?"

"पण तिथें तूं कामीं आलास तर? तुझ्या कुटुंबाची गत काय होणार? विचार केला आहेस का?"

"केला आहे सर्," कोणत्यातरी विशिष्ट भावनेनं भारावल्यासारखा तो बोलत होता. "माझ्या कुटुंबातले कुणीच माझ्यावर अवलंबून नाहींत. त्यामुळें ती काळजीच नाहीं माझ्यामागें. समजा, एकाद्या वेळीं तिथें देह ठेवावा लागला तर नक्कीच, पुन्हां इथेंच या देशांतच जन्म घेईन..... पुनर्जन्म मिळेल मला."

"त्याचा चेहरा लालबुंद दिसत होता.

"पुनर्जन्म?"

आपण खो खो हंसलों होतों. आपल्या लोकांतील भाविकता अजून मावळली नाहीं म्हणून चुकचुकलों होतों.

असा पुन्हां जन्म मिळणं शक्य आहे का? कुणास माहित! मी कांही तत्वज्ञानाचा अभ्यास केला नाहीं....जानकीचं ऑपरेशन् कसं झालं असेल? ती तिथें मृत्यूशीं झुंज देत असताना मी इथें हात बांधून बसलों आहे, षंढासारखा...काय करावं? ट्यॅहां.. ट्यॅहां.. कुणाचा आवाज आहे हा? नव्या बाळाचा? पण..आई ज्यानं धीर दिला पाहिजे तो मीच असा हातपाय गाळून बसलों तर? 'कर्नल जाधव, यु हॅव वीन अॅवार्डेड परमवीर चक्र..' परमवीरचक्र?... हा...हा.. सारं अंग वितळून पाणी होतंय् कीं काय? काय झालं असेल बाळाला? मेलं काय? कां मारलंन्? कांही का असेना, आई जगेल ना? काय सांगितलं होतं आपण? 'सेव्ह द मदर?'.... वांचली का ती?.. माझी..

"जगू, अंग गार पडलंय् कीं रे तुझं" त्यांचा हात दाबून पाहात राधाबाईनीं विचारलं, "बराच वेळ झाला, तूं आला नाहींस म्हणून वाट पाहून कंटाळून शोधत आलें मी इथें. तूं तर झोप लागल्यासारखा पडून होतास."

आईला पाहातांच झोपेंतून उठल्यासारखे ते खडबडून उठून बसले. आईच्या आवाजांत किंचित्हि कांपरेपणा नसल्याचं पाहून त्यांना समाधान वाटलं.

"काफी आणायला सांगूं?" असं विचारून त्यांच्या उत्तराची वाटहि न पाहातां हॉस्पिटलच्या बॉयला हांक मारून राधाबाईनीं सांगितलं.

"एक कॉफी लाना."

नोकरानें आणलेल्या कॉफीचे गरमगरम घुटके घेतल्यानंतर जाधवाना जरा बरं वाटलं. खिडकींतून वाराहि आंत येत होता. आपल्या खाकी कोटाचं वरचं बटण सोडीत त्यानीं आईला विचारलं.

"तुला कळलंय् का?"

त्याला पुढें बोलूं न देतां राधाबाई म्हणाल्या,

"हो, सगळं समजलंय् नर्सकडून. नशिबाला किती परीक्षा घ्यायची आहे कोणास ठाऊक....."

शून्य नजरेनें जाधवांनीं खिडकींतून बाहेर पाहिलं. पुसट पुसट होत जाणारा प्रकाश आतां पूर्णपणें पुसून जाण्याच्या बेतात होता. माणसें परतत होतीं. मघाशीं पाहिलेले ते पतंगांचे ठिपके आतां कुठें दिसत नव्हते. अचानकपणें रस्त्यावरच्या दिव्याची रांग उजळून उठल्यामुळें एका क्षणांत सारा आसमंत तेजाळून उ ला. मरीनड्राइव्हवरील अर्धचंद्राकृतींत उभ्या असलेल्या घरानीं झगमगत्या रत्नांचे हार धारण केल्यासारखं वाटूं लागलं. समुद्रानें आतां गंभीर नादांत ताल धरला होता.

ऑपरेशन् थिएटरचं दार उघडलं. जवळ येऊं लागला तसा डॉक्टरांच्या बुटांचा आवाज मोठा होत होत जाधवांच्या छातीवर ठोकूं लागला. आपलं काळीज तुडवीत ते येत असल्याचा जाधवाना भास झाला. सारा देह कान होऊन ऐकूं लागला.......

"ऑपरेशन् ईज् सक्सेस्फुल्. मदर ईज सेव्हड."

शहाऱ्यांची एक लाट डोक्यापासून पायांपर्यंत शिरशिरत गेल्यासारखं त्यांना वाटलं.

डॉक्टरांनीं उच्चारलेल्या शब्दांचा अर्थ राधाबाईच्या लक्षांत आला असावा.. उफाळणारं रडं गिळायचा प्रयत्न करीत त्या म्हणाल्या, "मूल गेलं ना?"

"गेलं नाहीं आई," आईची समजूत घालीत जाधव गंभीरपणानें म्हणाले, "पुन्हां येणार आहे... नक्की येणार आहे.."

उचंबळून येणारा हुंदका मग त्यांनाहि आवरतां आला नाहीं. ●●●





अनुक्रमणिका

# अनपेक्षितपणें रंगलेली टेस्टमालिका





## भारत-न्यूझीलंड दौऱ्यांतील वेचलेले कांहीं कण आणि क्षण

**माझ्या** माहितीचा एक उत्साही तरुण होता. क्रिकेटच्या पैंजा लावण्याचे त्याला अतोनात वेड. विशेषतः इंग्लंडमध्ये टेस्टमालिका असली की पैंज लावण्यास त्याला फार हुरुप यायचा. इंग्लीश भूमीवर इंग्लंडचाच संघ जिंकणार असं त्याचं एक आवडतं मत होतं. त्यामुळे इंग्लंडमध्ये कुठलाहि संघ दौऱ्यावर गेला तरी याची आपली पैंज इंग्लंडच्याच बाजूनं. त्या देशात दुसरा संघ जिंकू शकतो ह्या गोष्टीवर त्याचा कधी विश्वासच बसायचा नाहीं ! भारतातसुद्धा मध्यंतरी टेस्ट मालिकेचा 'निकाल' एका ठराविक साचाचा होऊन गेला होता. भारतात टेस्टस् खेळल्या जातात त्या दोन्ही संघांची बरोबरी सिद्ध करण्यासाठीच असा एक समज इथं रूढ झाला होता. त्यामुळे कुठल्याहि शाळकरी मुलाला विचारले तरी तो छातीठोकपणे सांगे की "ही टेस्ट अनिर्णित राहाणार!" आणि गंमत अशी कीं, ते त्याचे बोल खरे होत. प्राईसला घेऊन इंग्लंडचा संघ येवो की लार्टरला घेऊन येवो, नाहीतर कुंपणापलिकडचा पाकवाल्यांचा संघ येवो, "सामना अनिर्णित होणार" असे उत्तर दिले की काम भागत असे. परवा परवापर्यंत ही गोष्ट खरी होती. स्मिथसाहेब आपल्याकडे त्यांचा काफीला घेऊन आले आणि धड पराभवही नाही नि विजयही नाही अशी अर्धवट अवस्था ठेवून निघून गेले. त्या अगोदर पाकनेही काश्मीर प्रश्नाप्रमाणेच टेस्टचे घोंगडे भिजत ठेवले आणि त्याचा निकाल लावण्यास कुठलीच मदत केली नाही ! त्यामुळे भारतातले सामने अनिर्णित राहाण्यासाठीच असतात असे ठरून गेल्याने पैंज लावणाऱ्यांचे खूप फावत असे. किंबहुना पैंज लावण्याचे कारण उरत नसे. कारण सर्वांचे मत एक. भारतात प्रत्येक क्षेत्रामध्यें मतामतांचा इतका प्रचंड गलबला असतांना त्यावेळी क्रिकेट हे एकच क्षेत्र असे होते की, त्यांत निकालाबाबत दुमत होत नसे. भावनात्मक ऐक्यासाठीं ती एक पोषक गोष्ट होती! दुमत नाही, वाद नाहीत!

परंतु आता पतौडीने ती पूर्वीची सारी घडी विस्कटली आहे. भारतात हल्ली होणारे सामने निकालीही निघू लागले आहेत. पतौडीमुळे आता पैंज मारूं इच्छिणाऱ्यांची सोय झाली आहे. विजय अथवा पराजय भारतीय सामन्यात मिळूं शकतो हे आता सिद्ध झाले आहे. त्यामुळे पैंजेला विषय मिळाला आहे. पैंजेचा विडा रंगायचा म्हणजे त्यात निकालाच्या अनिश्चिततेचा कात हवाच! तो पूर्वी नव्हता म्हणून विड्याच्या पानाप्रमाणेच सामन्याचा अगदी बेचव चोथा होऊन जायचा.

ऑस्ट्रेलियाने गत वर्षी म्हणजे १९६४ च्या हंगामात भारतावर स्वारी केली आणि दोन तडफेचे कप्तान समोरासमोर आले. पहिला मद्रासचा सामना निकाली निघाला आणि आपण हरलो. परंतु त्यांत शेवटच्या दिवशी उपाहारापर्यंत भारताचीच सरशी होईल असे वाटत होते. मांजरेकर व हनुमंतसिंग यांनी दोन हात केले, पण मांजरेकर पडल्यावर डाव कोलमडला. मात्र अखेरपर्यंत लढण्याची नवी ईर्षा त्या सामन्यात आपल्या खेळाडूमध्ये दिसून आली. दांडगी चिकाटी दाखवून आपणास तो सामना पराभवाच्या कैचींतून

बाळ ज. पंडित

सोडवून अनिर्णित ठेवता आलाही असता ! आणि भारतीय फलंदाजांजवळ परंपरागत चालत आलेली चिकाटी ही दांडगीच असते हे निराळे सिद्ध करायला पाहिजेच असे नाहीं. हा पुरावा भारतीय क्रिकेटच्या इतिहासात पानोपानी विखुरलेला आहे! दुसरी मुंबईची टेस्ट तर आपण जिंकलीच. समोर संघ कसाही असो, सरळ चाल करून धडक मारण्याचे सामर्थ्य आपल्या अंगात आलेले त्यावेळी दिसले. खेळाडूंच्या एकदिलाचा तो परिणाम. पूर्वी सी. के. आणि अमरसिंग यांचा बेबनाव पाहिलेले ते मुंबईचे मैदान. दोघांची तोंडं दोन दिशेला. एकमेकांशी 'बोलण्यासाठी' त्यांना मध्यस्थ लागायचा! ते आता पुसले जाऊन दशानन रावणापेक्षा एक तोंड जास्त असलेला एकादश वदनाचा पतौडी स्वतः चांगला खेळला. त्याचे स्वतःचे क्षेत्ररक्षण आदर्शवत् झाले. हाताखालच्या दहा खेळाडुमधले 'चांगले' तेवढे त्याने बाहेर





अनुक्रमणिका

काढले! संघाच्या यशास ही एकी आणि हे सर्वांचे बळ कारणीभूत झाले. कलकत्त्याचा तिसरा सामनाही त्यावेळी चांगला रंगत चालला होता. पण ऐनवेळी पावसामुळे सामन्याचा बेरंग झाला. तो सामनाही कोण जिंकेल हे प्रत्यक्ष खेळाडूनाही सांगता आले नसते. मुंबईचा सामनाही तसाच झाला होता.

नंतर सिंहली खेळाडु येथे आले. त्यांच्या तीनही टेस्टस् निकाली निघाल्या. पहिल्या दोन आपल्याला विजय देऊन संपल्या आणि तिसरीत आपला प्रायोगिक किशोर संघ खेळल्याने आपला सपशेल पराभव झाला. सामन्यात यश मिळाले नसले तरी वेंकट-राघवन्, सक्सेना, अंबर रॉय, कुलकर्णी, भास्करन्, राजेंद्र गोएल हे नवे खेळाडु हुडकण्यात आपणास यश लाभले खास.

मात्र न्यूझीलंड बरोबरचे पहिले दोन टेस्ट सामने ज्या रूळावरून चालले होते त्यावरून पहाता हीहि टेस्टमालिका आपल्या जुन्या परिचित मुक्कामालाच जाऊन पोचणार की काय असे काही काळ वाटू लागले होते. खेळाने रूळ बदलले तर बरे होईल असे मनोमनी वाटत असतानाच मुंबईची जीवघेण्या चुरशीची लढत जुंपली गेली आणि दिल्लीला तर निकाली कुस्त्यांचे मैदान गाजले! दौऱ्याच्या पहिल्या दिवशी ज्या भारतीय संघाने, मद्रासला ५ बाद २२५ ह्या संथ धावा केल्या होत्या, त्याच संघाने दौऱ्याच्या शेवटल्या दिवशी दिल्लीला ४२ मिनीटांत ७० विजयी धावा केल्या आणि त्याच्याच दोन दिवस अगोदर २७५ मिनिटात ३४० धावांचा धबधबा सोडला! संघात दिसून आलेला हा बदलच भारतीय विजयास कारणीभूत झाला आहे असे मला वाटतें. प्रारंभी धावासाठी ईश्वराचा 'धावा' करावा लागला तर शेवटी धावांची इतकी धावपळ उडाली की हे अपूर्व दृश्य आपण भारतीय मैदानावरच पाहात आहोत की काय असा संभ्रम निर्माण होऊन हाताला चिमटा काढण्याची पाळी आली! आपल्या संघांत हा बदल हळु-हळु झाला हे मान्य आहे. मद्रास-कलकत्ता या दोन टेस्टस्ची साधना संपल्यानंतरच हा 'मूड' आपल्याला लाभला! यश हे असे आहे. सुरवातीला ते मिळवण्यास वेळ लागतो पण प्रयत्न केल्या-नंतर ते मिळाल्याशिवाय राहात नाही.

मुंबईला न्यूझीलंडचा "शाईस्तेखान" झाला होता. पण दिल्लीला त्यांचा "अफझलखानच" झाला. मुंबईला त्यांचे ८ गडी बाद झाले असतांना वेळ संपला म्हणून कसेबसे बोटावर निभावले गेले. परंतु दिल्लीला राघवन्ची वाघनखं आणि धावांचा हल्ला उपयोगी पडला. तिथं न्यूझीलंडचा पूर्ण पराभव होऊन टेस्टमालिकेचा निकाल लागला आणि रबर भारतीयांच्याच हातात राहिले. अशा रीतीनें भारतात हल्ली टेस्टमालिकेंतले काही सामने तरी निकाली निघूं लागले आहेत. पूर्वीचे बचावाचे धोरण जाऊन त्याची जागा आता आक्रमक डावपेचांनी घेतली आहे हे चांगले झाले. अर्थात् विजयाची टाळी एका हाताने कधीच वाजत नसते. त्यामुळे सारे श्रेय पतौडीलाच देता येणार नाही. ऑस्ट्रेलियाच्या बॉबी सिंपसन्ने ज्याप्रमाणे 'पराभव झाला तरी बेहत्तर पण अखेर-पर्यंत विजयासाठी प्रयत्न करायचा' हे धोरण ठेवले त्याचप्रमाणे न्यूझीलंडच्या जॉन रीडनेही मुंबई-दिल्लीचा सामना झुंजवण्यास मदत केली.

दहा वर्षापूर्वीच्या न्यूझीलंड संघात मॅक्‌गीवन, हेज् व केव्ह हे नव्या चेंडूचे गोलंदाज होते. पण त्यापेक्षा आताचे टेलर, मॉटझ् कॉलींज् व कॉंग्डन् हे जास्त यशस्वी झाले. म्हणजे जलदगति गोलंदाजीत त्यांचा या वेळचा संघ बळकट वाटला. त्यांना योग्य विकेट मिळाले तर प्रतिपक्षाला धास्ती वाटल्याशिवाय राहाणार नाही. परंतु कुठलाही संघ एका विभागात जोरकस असून भागत नाही. वेगवेगळ्या विभागात त्याची समबलता हवी. नेमका यातच न्यूझीलंड संघ कमी भरला. अजूनही त्यांची फलंदाजी मुख्यत: रीड व सटक्लीफवरच अवलंबून आहे. याचाच अर्थ असा की गेल्या दहा वर्षात त्यांच्या एकाही नव्या फलंदाजाने रीड व सटक्लीफची (वयमानपरत्वें कमी झालेली) उंचीसुद्धा गाठली नाही. मॉर्गन, डाऊलींग व सिंक्लेअर हे फलंदाज थोड्याफार धावा करतात पण त्यांच्या भात्यात वेगवेगळे फटके नाहींत. त्यांचा खेळ तडफदार होऊं शकत नाही. नवा ब्रुस टेलर उमेदीचा वाटतो. पण तो बेभरंवशी असून त्याचेजवळ सातत्याचा गुण दिसत नाही. एकंदरीत गोलंदाजीचा विभाग ठीक असूनही फलंदाजीत काही प्रगति करता न आल्याने एक चाक मोडलेल्या बैलगाडीप्रमाणे न्यूझीलंड संघाची अवस्था झाली आहे असें मला वाटते.

दम्याचा रोग असलेल्या दमेकऱ्याची दर पावसाळ्या-हिवाळ्यात जी स्थिति होते तशीच स्थिति भारतीय संघाची द्रुतगति गोलंदाजीच्या वेळी होत असते. दम्याचा रोग जसा हटत नाही, तसाच भारतीय फलंदाजांचा हा 'दम्याचा रोग' न हटणाराच वाटतो. मुंबईला आम्हास विलक्षण उबळ आली. इतकी की रोग्याचे आता काय होतें हेच तिथे कळेनासे झाले होते. पण थोड्याच अवकाशात तोच रोगी रोगमुक्त होऊन तरण्याबांड घोड्याप्रमाणे शर्यतीत उतरला! त्यामुळे शर्यतही झाली कशी "नेक-टु-नेक"! दिल्लीला तर आपणास एकदाही खोकल्याची ढास लागली नाही. तिथल्या शर्यतीत आपण शेवटच्या कांही मिनिटात हजार अश्वशक्तींचे बळ अंगी संचारल्याप्रमाणे दौड केली आणि प्रतिपक्षाच्यापुढे निघून गेलो! हा जुनाट रोग जेव्हा संपुष्टात येईल तेव्हां येवो, पण एरवी आपली फलंदाजी ठणठणीत असते. एकपासून नवव्या, दहाव्या क्रमांका-पर्यंत फलंदाजच असल्याने त्यापैकी कोणीतरी एक दोघे खेळून जातात आणि धावा करतात. जलद धावा काढण्याची आपली तयारी, हा सुद्धा पूर्वी फार क्वचित दिसलेला गुण हल्ली आपल्या फलंदाजीत आलेला दिसतो. पण हे सारे आपण वेस्ट इंडिज विरुद्ध करून दाखवले आणि आपले गुण प्रकट केले तरच आपली खरी पात्रता कळणार आहे.

सध्या भारतीय नियामक मंडळात, पश्चिम विभागाला दडपून टाकण्याची पद्धतशीर मोहीम उघडलेली दिसते. तिचे साद-पडसाद क्वचित किंचित संघातही उमटतात असे माझ्या विश्वसनीय रीत्या कानावर आले आहे. संघात असे राजकारण घडणे कदापिही रास्त

नाही. पतौडीसारखा उमदा, सुशिक्षित, सुसंस्कृत आणि गुणी कप्तान आपल्याला लाभलेला असतांना त्याच्याविषयी शंकेचे वातावरण असणे भारतीय क्रिकेटच्या दृष्टीने बरे नाही. सध्याच्या निवड-समितीवरही माझा नितांत विश्वास आहे. त्यातले बहुसंख्य सभासद टेस्ट खेळलेले खेळाडु आहेत. त्यांनी ह्यांत लक्ष घालून असे प्रकार थांबवण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. त्याचप्रमाणे खेळाडु शारिरीक दृष्ट्या पूर्णपणे समर्थ असेल तरच आणि तेव्हाच त्याला संघात घेतले जावे. न्यूझीलंडविरुद्ध असा एक प्रकार घडला आहे की खेळाडु बरा झालेला नसतानाही त्याला संघांत घेण्यात आलेच. त्याशिवाय खुद्द निवडीबाबत एकदोन मतभेदाचे मुद्दे सांगता येतीलही. परंतु सर्वसाधारणपणे कप्तान व निवडीचे सदस्य हे सध्या धोरणी आणि महत्त्वाकांक्षी आहेत हे खास.

कुठल्याही दौऱ्यात थोडे 'कडु-गोड' असायचेच. विजय झाला हे जसे गोड झाले तसे विजय मांजरेकरचे निवृत्तीचे 'प्रकरण' कडवट झाले. कुठल्याही खेळाडूच्या अनुपस्थितीमुळे संघाचे आडत नाही हे कुणीही कबूल करील. कारण तसे नसते तर आजवर टेस्टचे सामनेच अव्याहतपणे झाले नसते. परंतु हजारे, मन्कड, यासारख्या खेळाडूवर झालेले अन्याय शेवटचेच ठरले असे वाटत होते. त्यात भर पडणार नाही असे वाटत असतानाच पूर्वीचेच धरसोडीचे अदूर-दर्शी धोरण अजूनहि चालूच आहे हे पाहून आश्चर्य व्यक्त करावेच लागते. तरुणांना संधि देण्याच्या स्तुत्य उपक्रमात जे आजही जुने भरात आहेत त्यांना वगळण्याचे खरोखरी काही कारण नाही. कुठल्याही परिस्थितीत देशाचा सर्वोत्कृष्ट संघ खेळला जावा हा दृष्टिकोन डोळ्यासमोर ठेवला तर तिथे वयाचे बंधारे आड येणार नाहीत. येऊ नयेतही !

न्यूझीलंड संघाने भारताचा आत्मसंतुष्टतेचा फुगा फोडला आहे. आपणास हल्ली फास्ट बोलींग चांगली खेळता येते हाच तो खोटया समाधानाचा फुगा. त्याचप्रमाणे उत्कृष्ट आघाडी फलंदाजांचा आणि गोलंदाजांचा अभाव असतानाही आपण आत्तापर्यंत काही सामने जिंकले खरे. पण पुढे तसे करून चालणार नाही. आपल्या न्यूनांची योग्य दखल आपण वेळीच घेतली पाहिजे, आणि सध्याचे अवगुण घालवण्याचा यत्न केला पाहिजे. भारतीय फलंदाजींतील व मंदगती गोलंदाजींतील मर्यादा उघड्या पाडण्याचे दृष्टीने न्यूझीलंड दौऱ्याचा आपणास फार चांगला उपयोग झाला आहे हे मान्य करावेच लागेल.

राघवन्‌चा नवा शोध ही न्यूझीलंड दौऱ्याची मोठीच देणगी म्हणावी लागते. परंतु नाडकर्णी, दुराणी व चंद्रशेखर ह्यांचा कस थोडासा झिजला असताना एकटया राघवनची त्यात भर पडावी ही गोष्ट भारताच्या मंदगति गोलंदाजीची शक्ति कमी झाली हे दर्शवते की जास्त झाली हे दर्शवते ? सारांश, टेस्ट मालिकेचा ह्यावेळी चोथा झाला नाही हे बरे झाले. जुन्या दौऱ्यांच्यावर ताण करून हा दौरा सर्वसामान्यांना मनोरंजक वाटला आणि भारतीय क्रिकेटविषयी आस्था बाळगणाऱ्यांना तो उद्‌बोधकही वाटला, हे सर्वात चांगले झाले असे म्हणावेसे वाटते. ●●●



# रसलीना

## छायास्पर्श

(प्रसंग—नायकाला बघताच नायिकेनें केलेले प्रेमदर्शक हावभाव व चेष्टिते पाहून नायक मोहीत झाला आहे. तो स्वगत म्हणतो.

ओढणी बाजूला सारून तिनं डोळयाला डोळा भिड-विला, आणि लालस नजरेनं माझ्याकडे पाह्यलं, आणि क्षणांत माझ्या पावलावर आपली छाया पाडून वंदन करून निघून गेली.)

पदर सारुनी पाहती लोचन लालस धीट<br>
जाता स्पर्शित पाउले पडछायेनें नीट

## विरल वसना

(प्रसंग :— विरल वसनांतून फुटून बाहेर पडणारी नायि-केची तनुकांति पाहून नायक मोहित होतो. तो स्वगत म्हणतो.

अहाहा ! हिच्या ह्या श्वेत विरल वसनांतून ओसं-डून येणारी सुंदर देहकांति विलसते आहे. जणुं काय कल्प-वृक्षाची सपल्लव डहाळच समुद्रांत जलक्रीडा करीत आहे.

'विरल वसन तनुकांति ती झिलमिल झळके अंग<br>
सुरतरुपल्लव डोलवी मानससिंधुतरंग

## जलक्रीडा

(भूमिका) जलक्रीडा करीत असलेल्या नायिकेकडे दूति नायकाचं लक्ष वेधते. व तिच्या अंगप्रत्यंगाचं व गौरवर्णाचं कौतुक करिते.

ती बघा ती सुवर्ण हंसी जलक्रीडा करते आहे. ज्या ज्या बाजूला ती डुबकी घेते तिथलं तिथलं सरितेचं पाणी तिच्या अंगकांतिमुळं केशरी रंगाचं भासतं.

जलकेलि करी सरितेत सखी कलती जल कापित जात जशी<br>
उरि कुंभ तरंगवि काय बरी लहरीवर वाहत घेइ उशी<br>
चुबके जल पाठपन्हाळ भरे तरि घे डुबकी वळवीत कुशी<br>
वलयांतुनि ये वर कंजमुखी उडवीत तुषार मिलिंद जशी<br>
कच कुंतल गुंफियले सलिली सलिली जल बिंदुसरातुनि मोतिलरी<br>
तनु कांतिप्रभा जल गौरविते सरिता जणु केशरी रंगवरी.

—राजा बढे












टी. सी. नें पास विचारला. त्यानें पास काढून दाखविला....सोबत एक पत्र हातीं लागले. आणि त्या पत्रानें सानेची सारी दुनियाच बदलून टाकली—
—तो धाडकन् जमिनीवर कोसळला.



—प्रेमानन्द वळवईकर

**साडे पांच** वाजायला दहा मिनिटं होतीं. शेवटच्या मिनिटापर्यंत कामांत गुंतून बसणारा विभाकर आज दुर्मुखलेल्या चेहऱ्यानं पुनः पुन्हा घड्याळाकडं पाहात होता. कधीं एकदाचं ऑफिस सुटतं याची तो आतुरतेनं वाट बघत होता. आफिसच्या त्या कुबट वातावरणांत त्याला क्षणभरदेखील बसावसं वाटत नव्हतं. परंतु घड्याळाचे कांटे जणू पुढं सरकतच नव्हते. त्यांनीहि त्याच्या विरुद्ध चंग बांधला होता कीं न कळे! अस्वस्थ मनःस्थितींत वसल्या जागीं कुढत होता. टेबलावरचे कागद ट्रेमध्यें कोंबून स्वस्थ वसला होता. घरीं जायच्या तयारींत होता.

तो चर्चगेट स्टेशनवर आला त्यावेळीं त्याची नेहमीची पांच पन्नासची फास्ट गाडी यायला अजून अवकाश होता. खरं म्हणजे ऑफिसातून बाहेर पडताना तो आज लिफ्टसाठीं थांबला नाहीं. किंवा नारकर, आरोळे, देशपांडे यांच्या कंपनीसाठींहि रेंगाळला नाहीं. सरळ स्टेशनचा रस्ता धरला.

प्लॅटफॉर्मच्या मधोमध लोंबकळणाऱ्या मोठ्या समयदर्शक फलकावर त्यानं नजर टाकली. ती बोरिवली धीमी गाडी होती. तो गाडीच्या दिशेनं निघाला. ठराविक गाडीकरितां त्याला थांबावसं वाटलं नाहीं. अंधेरीपर्यंत जाणारी कोणतीही धीमी, तेज गाडी चालण्यासारखी होती. तो डब्यांत चढला. डावीकडील कोपऱ्यांत थोडीशी जागा रिकामी होती तिथं जाऊन बसला.

वसल्या जागेवरून त्यानं उगीचच आजूबाजूला पाहिलं. आघाडीवरून परतणाऱ्या सैनिकांप्रमाणं कारकून मंडळीनं तो डबा नेहमीसारखा खच्चून भरला होता. वसायला न मिळाल्यामुळं निराश चेहरे करून बरेच जण दारापाशीं व मधल्या चिंचोळ्या जागेंत अवघडून उभे होते. आणि जरा कुठं जागा खालीं होते का याची डोळ्यांत जीव आणून टेहळणी करत होते. बुभुक्षितांनीं अन्नावर किंवा गिधाडांनीं मृत ढोराच्या शवावर....त्याला किळस आली. जागा....जागा.....जागा....! वसायला जागा.....निवाऱ्याला जागा.... वरच्या हुद्द्याची जागा!

या विचारानिशीं त्याचं सारं शरीर एक प्रकारच्या आत्मिक तिडीकीनं कंपायमान झालं. राखेच्या पोटांत धुमसणाऱ्या अग्नीच्या ठिणगीप्रमाणं विचारांच्या आवर्ताबरोबर आजतागायत दडपलेला क्रोध हळूहळू वर उफाळून येत होता.

विभाकराच्या समोरील बाकांवर खिडक्यापाशीं कांहीं कारकून मंडळी पत्त्यांचा डाव मांडून बसली होती ! अधुनमधून खेळाच्या सांकेतिक भाषेतून आरडाओरड करीत हास्याचे फवारे सोडत होती. भोंवतालचे बघे कारकून त्यांना साथ देत होते. इतरांचे चेहरे कसे काळजीनं काळवंडलेले! दारिद्र्याच्या भक्कम चौकटींत दैन्य, दुःख आणि दुस्थितीच्या पाऱ्यानं ओतलेले जिवंत आरसे !

डब्यांतील प्रत्येक माणूस त्याला स्वतःच्या जागीं दिसूं लागला. तेंच लाजिरवाणं, अवहेलनात्मक जीवन जगणाऱ्या असंख्य कळसूत्री बाहुल्यांचा मेळावा त्याच्या नजरेसमोर नाचूं लागला.

——गुलामाप्रमाणें विशिष्ट चाकोरींत रूळलेले. साडेदहा ते साडेपांच. ठरलेली वेळ. एक मिनिट मागंपुढं नाहीं. सकाळीं उठल्याबरोबर ऑफिसचा धसका. त्यासाठीं मग पायपीट करावी. बसच्या क्यूत दोन दोन तास ताटकळत उभं राहावं. लोकलच्या बाहेर लोंबकळत ऑफिसपर्यंत प्रवास करावा. ठीक साडेदहाला मस्टरवर सही आढळली पाहिजे. अन् उशीर झाल्यास.... महत्वाच्या कामासाठीं घरीं राहिल्यास...... आजारी पडल्यास.....मग

——एखाद्या खुनाच्या आरोपीप्रमाणं खालीं मान घालून बिचकत बिचकत ऑफिसात शिरणारे, वाचा असून मुके, सामर्थ्य असून दुर्बल, स्वतंत्र असून परतंत्राने चालणारे....तेंच तेंच बंदिस्त, नीरस आयुष्य.... कंटाळवाणा दिनक्रम.....इन वर्ड आउट वर्ड..... कागद फायली....









अनुक्रमणिका

अर्जंन्ट कामाचे फ्लॅग्स.... प्रमोशन...... डिमोशन.... इन्क्रिमेन्ट.... स्टेटमेंट्स.....मेमो..... एक्स्प्लेनेशन..... अपोलॉजी.... टर्मीनेशन..... त्याचं डोकं भणभणूं लागलं. किती तरी विचार त्याच्या डोक्यांत गोळा होऊं लागले. ...... तो सेक्शनल हेड व त्याची आढ्यताखोर वृत्ति, सुपरीटेन्डेन्टची अरेरावी. आणि हुकूमशहा साहेबाची मर्जी संपादन करण्यासाठी.......

—त्याची तळपायाची आग मस्तकाला भिडली.

—साहेब ...... ! कसले साहेब....?.....थू: !!

छपून राहिलेल्या वाघानं सावज जवळ येतांच एकदम झाडीतून बाहेर उडी घ्यावी, त्याप्रमाणं साहेबाच्या आठवणीसरसी विभाकराच्या मनांत कोंडलेला सारा क्रोध उफाळून आला.

दुपारच्या प्रसंगाची त्याला आठवण झाली.

— सकाळपासून त्याची तब्येत ठीक नव्हती. त्याचं डोकं दुखत होतं. अंगांत किंचित् तापहि होता. एक प्रकारची सुस्ती वाटत होती. अगदीं स्वस्थ पडून राहावसं वाटत होतं. कोणत्याच गोष्टींत उत्साह नव्हता. दुसरा कोणी असता तर सहसा ऑफिसला आला नसता ! एका दिवसाऐवजीं तीन दिवसांची सी. एल्. घेऊन मोकळा झाला असता !

—परंतु अंगांत ताप असूनदेखील घरी राहणं त्याला प्रशस्त वाटलं नाहीं. महिना अखेरचीं कामं उरकायला हवींत. आधींच डिपार्टमेंटमधे माणसं कमी. त्यामुळं कामाचा बोजा अधिकच वाढला होता. घरीं राहिल्यानं हीं कामं कशीं आटपायचीं. असा कांहींसा विचार करून तो सकाळीं ऑफिसला निघाला होता.

बऱ्याच दिवसांनी भेटायला आलेल्या एका मित्रावरोवर विभाकर कँटिनमधे बोलत बसला होता. तेवढ्यांत सोमा शिपायानं नेने साहेब दोनदां बाहेर येऊन गेल्याची सान्याला वर्दी दिली. तसाच तो उठला. मित्राला निरोप दिला. धांदलींत अँनासीनच्या एक दोन गोळ्या तोंडांत टाकल्या. व वरून ग्लासभर पाणी प्याला.

कॅबिनचं दार लोटून तो आंत गेला त्यावेळीं नेनेसाहेब कसलं तरी सर्क्युलर वाचण्यांत दंग होते. तो टेबलापासून थोडं अंतर ठेवून उभा राहिला. साहेबाची नजर मजकुरावरून फिरत होती. ओठांच्या एका कडेला अलगद धरलेली सिगरेट सावकाश जळत होती. सिगरेटचा जळलेला अग्रभाग तसाच चिकटून होता. त्यांतून निघणारी धुराची दुधाळ लकेर संथ गतीनं वरच्या दिशेनं जात होती. व मधूनच वाऱ्याच्या झुळकीनं विखरत होती.

साहेबानं नजर करून पाहिलं त्यावेळीं विभाकर साने त्यांना समोर उभा असलेला आढळला. त्यासरसी त्याच्या कपाळावर आठ्या पडल्या. डाव्या हातानं डोळ्यांवरील चष्मा दूर सारला व उजव्या हातानं तोंडातील सिगरेट त्यानीं अॅश-ट्रेमधे टाकून दिली. साहेबाच्या चेहऱ्यावरील नाराजीच्या छटा स्पष्ट दिसत होत्या. सान्याच्या मुद्रेवर प्रश्नचिन्हाचा आकार अधिकाधिक वाढत होता.

"कुठं होता इतका वेळ ?" साहेबांच्या उद्गारांत कडवटपणाची धार होती.

तो जागेवर नव्हता ही गोष्ट खरी असली तरी त्याला नमकं कारण सांगावसं वाटलं नाहीं. तो कांहींच बोलला नाहीं.

"मी दोनदां बाहेर आलों." साहेबानं त्याच आवाजांत पुढील वाक्य उच्चारलं.

—सान्याला कांहींतरी बोलणं आवश्यक होतं. तो म्हणाला,

"शिपायाकडून कळलं मला.

"स्टेटमेन्टस् सगळे तयार आहेत ना ? – साहेब.

"कोणते ?"

"सी डिव्हिजन ब्रँचचे."

"होय...."

"—आणि हेड ऑफिसचे ?"

"नाही."

"अजून नाहीं झाले ?"

त्यानं नकारार्थी मान हालवीत म्हटलं, "आजच करायला घेतले आहेत."

"पण आज तारीख किती माहीत आहे ना ? पंधराला म्हणजे उद्यापर्यंत स्टेटमेन्टस् गेलीच पाहिजेत."

"तें कसं शक्य आहे ?" साने किंचित् काळजीच्या स्वरांत म्हणाला.

"कां शक्य नाहीं ? आज संध्याकाळीं लेट बसा. उद्यां सकाळीं जरा लवकर या. घ्या वाचा हें हेडऑफिसचं पत्र. येत्या वीस तारखेला एक्झीक्युटीव्ह कमिटीची मीटिंग आहे. त्याच्या अगोदर स्टॅटिस्टीक्स तयार व्हायला हवी."

"तें सगळं खरं. पण —" बोलतांना तो मधेंच अडखळला.

"पण काय ?"



"सकाळपासून माझी तब्येत ठीक नाहीं. तरीदेखील तीन दिवसांच्या आंत स्टेटमेन्टस् पुरे करण्याचा प्रयत्न करीन." त्यानं आपली खरी-खुरी अडचण शक्य तो सौम्य शब्दांत सांगितली.

"नो, नो ! हाव इजीट ?" साहेब एकदम उसळून म्हणाले.

"तें कांहीं नाहीं. ऑफिसच्या कामापुढं तब्येतीची सबब चालायची नाहीं. उद्यांच्या उद्यां काम संपलं पाहिजे." निर्वाणीच्या आवाजांत साहेबांनीं हुकूम सोडला.

साहेबांचा हा असला आडमुठेपणा सान्याला नवीन नव्हता. ऑफिसांतल्या प्रत्येक माणसाला त्याच्या या विक्षि त आणि उद्धट वृत्तीचा चांगलाच अनुभव होता. सर्वांवर त्यांचा एक प्रकारचा वचक, दरारा असला तरीं सादर भावनेनं त्यांचा कोणी उल्लेख करत नसे. उलट त्यांची चीड येत असे.

स्वतःवर होत असलेल्या अन्यायाची आणि पक्षपाताची बोंचणी सान्याला प्रकर्षानं जाणवूं लागली. आपल्या दुबळेपणाचा साहेबानी गैरफायदा घ्यावा ह्याचं त्याला मनस्वी दुःख झालं. खरं म्हणजे कामचुकारपणा त्याला कधीं जमला नाही. उशिरां येण्याच्या सवलतीची त्याला कधीं गरज भासली नाहीं. अकारण दांडी मारण्याचा मोह कधीं झाला नाहीं. प्रसंगी लँच-टाइम सोडूनहि कामाचा उपसा करीत तो बसत असे. कुणाच्या विशेष सूचनेची त्याला आवश्यकता लागत नसे. ना कुणाच्या अध्यात की मध्यांत. आपलं काम कीं आपण. हा त्याचा सरळ खाक्या.

—आणि आतां तर साहेब त्याला उघड उघड "प्रकृतीची सबब" म्हणत होते. त्याला ते शब्द अगदीं असह्य झाले. त्याच्या जिव्हारीं बसले. अंतःकरणाला भिडले. आजवर अपमानकारक असे अनेक प्रसंग निमुटपणें त्यानें साहिले होते. पाहिले होते. ते केवळ नाइलाज म्हणून. स्वतःच्याच भावनांशीं केलेली ती एक तडजोड होती... एक सौदा होता. परंतु स्वाभीमान पायदळीं तुडवला जात असताना मुक्यानं राहण्याइतका तो कोडगा नव्हता. नाहीं तरी त्यानं गप्प कां राहावं ? नोकरी करणं म्हणजे कांहीं गुलामगिरी नव्हे. त्यासाठीं कां त्यानं आपल्या मानीपणाचा विक्रय करावा ? स्वत्व विसरावं ? अन्यायाविरुद्ध प्रतिकार करणारी स्फोटक शक्ति जणूं त्याच्या ठायीं संचारूं लागली. आंतल्याआंत धुमसणाऱ्या क्रोधाचा उद्रेक अतीव वेगानं शब्दरूप घेऊं लागला. आगापिछा न पाहतां तो ताड्दिशीं उत्तरला—

"इटीज नॉट पॉसीबल !"

"यू मस्ट !"

"आय कान्ट..." साने तितक्याच निर्भीडपणं म्हणाला.

"यू मस्ट ओबे माय ऑर्डर्स !" चढत्या आवाजांतील विधान.

"आय डू ! पण तुमचं हें अन्यायकारक धोरण कंपनीच्या रूल्स आणि रेग्युलेशन्समधें बसणारं नाहीं."

"अन्यायकारक ?"

"अलबत ! न पेक्षां दोन माणसांचं काम तुम्हीं मला एकट्याला करायला सांगितलंच नसतं. तेंहि दोन दिवसांत. अर्जंट !"

"मग किती दिवस लागतात ?"

"निदान पांच दिवस."

"मुळींच नाहीं."

"आय नो. मला विचारा."

"मिस कर्वे रजेवरून आल्यावर मी त्यांनाच या गोष्टीचा जाब विचारीन."

"म्हणजे मिस कर्वे परत येणाराहेत तर ! सान्याचं एक खोंचक विधान.

"वॉट डू यू मीन ?"

साहेबांच्या आवाजांतील बदल स्पष्ट जाणवणारा होता. त्यांत किंचित भयाश्चर्याचं मिश्रण होतं. स्वतःचं बिंग बाहेर पडतं की काय याची त्यांना भीति वाटली. सामान्यतः ऑफिसमधे कुणालाही न मिळण्याइतकी रजा तिला मिळाली होती. पुऱ्या दोन महिन्यांची प्रिव्हिलेज लिव्ह. या रजेतच तिचं लग्नहि होतं. अन् अखेरीस हळूच राजीनाम्याचा अर्ज पाठवून सर्वांना चकित करणार होत्या. हे आपलं साहेबांचं स्वतःचं गुपित होतं. कर्व्यांचे वडिल साहेबांच्या मर्जीतले एक जानी दोस्त. म्हणून काय झालं ? सान्याच्या मनांत असंख्य गतस्मृति गर्दी करत होत्या. अन्यायाचा पुरेपूर वचपा भरून काढण्याच्या इर्ष्येनं त्याचं मन पेट घेत होतं. नेहमींचा साने आज राहिला नव्हता. तो चट्दिशी उद्गारला,

"वॉट आय मीन इज फॅक्ट ! मला काय माहीत नाहीं....?"

वास्तविक ऑफिसच्या दैनंदिन व्यवहारांत साहेबकारकुनाचे नरमागरम खटके म्हणजे कांहीं विशेष नवल नाही. साने तर साधा कारकून. साहेबासमोर आवाज उंचावून बोलत होता. त्यांची निर्भत्सना करत होता. संभाषणाला वेगळेंच वळण मिळत असल्याचं त्यांनीं ताडलं. त्यांना बोलण्याचा पवित्रा बदलण्याशिवाय गत्यंतर नव्हतं. कितीहि झालं तरी साहेब ! सत्ता व मत्ताधिकारी ! त्यांनीं कपाळावर आठ्या चढवल्या. भुवया उंचावल्या. डोळे विस्फारले व चढत्या आवाजांत टेबलावर मूट आदळीत साहेब एकदम कडाडले,

"यू शट् अप् ! कोणासमोर बोलताहांत याची कल्पना आहे का तुम्हांला ? आय कान्ट टॉलरेट दिस् सॉर्ट ऑफ सबॉर्डिनेशन इन माय ऑफिस. आय कॅन टेक डिसिप्लीनरी ॲक्शन अगेन्स्ट यू."

"यस्स् ! प्रोव्हायडेड आयम् ॲट फॉल्ट. बट आय नो बेटर वॉट आयम् ऑट टू बी. आय हॅव्ह रेड दि कंपनीज रेग्युलेशन. कंपनीच्या नियमांत तुम्हीं आम्ही सगळे नोकरच !" शेवटचं वाक्य सान्यानं अगदीं नाटकी अभिनयानिशीं उच्चारलं !

साहेबांचा राग अनावर झाला. यत्किंचित कारकून तो काय आणि आपल्यासमोर बेपर्वाइनं बोलतो कसा....? दीडशें रुपडेवाल्याची ही मिजास ! असल्या उर्मटखोरांना अद्दल घडवलीच पाहिजे. त्यांनीं मनाशीं कसलातरी निश्चय केला आणि आपलं शेवटचं हुकमी शस्त्र उगारलं, "यू गेट आउट फ्रॉम हियर !"

कॅबिनमधून बोलण्याचा आवाज वाढत होता. तसतसे कारकून मंडळीचे कान त्या दिशेनं टवकारले जात होते. कुणालाच नीटसा

बोध होत नव्हता. क्षणाक्षणीं सर्वांचंच कुतुहल वाढत होतं. प्रत्येक जण बसल्या जागेवरून एकमेकाला "काय झालं" अशा आविर्भावानं हातांच्या इशाऱ्यानं विचारत होते. शांत चित्ताच्या मितभाषी सान्याला एकाएकीं कंठ कसा काय फुटला ! डोकंबिकं तर फिरलं नाहीं ना ? कांहींजण तर्क बांधत होते. टायपिस्ट सुब्रमण्यम्नं तर थेट सुपेरिटेंडेन्ट घाटयांच्या टेबलाकडं जाऊन गुप्त चौकशीला प्रारंभ केला. घाटयांनीं कानावर हात ठेवले तसा सुब्रमण्यम् खांदे उडवत मागं फिरला व सरळ जाऊन जागेवर बसला. एक प्रकारचं तंग वातावरण पसरलं होतं.

साने जागचा हालला नाहीं. साहेबांच्या रागाचा पारा अधिकच चढला.

"आय से यू गेट आऊट !"

तरीहि साने तसाच निर्भयपणं उभा. त्याच्या चर्येवर निश्चयाचं तेज होतं आणि तुच्छताहि ! जणुं त्याला म्हणायचं होतं, माणुसकीला पारखे झालेल्या असल्या सत्तांध साहेबाच्या हुलकावण्याना मी कां घाबरावं ? नोकरी धरली म्हणजे कांहीं पाप केलं नाहीं. माणूस म्हणून प्रतिष्ठेनं जगण्याचा आम्हालाहि हक्क आहेच.

साहेबाची स्थिति चमत्कारिक झाली. साने तेथून हालण्याचं चिन्ह दिसेना. तेव्हां त्यानीं बेलची जोरांत कळ दाबली.

"मिस्टर घाटे !"

घाटे बहुधा त्यावेळीं चिमुटभर तपकीर नाकाच्या पुडींत भरण्यांत मशगुल होते.

"यस्स सर !" म्हणत धावऱ्या धावऱ्या त्यानी कॅबीनमध्ये प्रवेश केला.

सान्यानं क्रोधिष्ट नजरेनं आळीपाळीनं साहेबाकडं व घाटयाकडं पाहात कॅबीन सोडून बाहेर आला.

"इश्यू हिम ए स्ट्राँग मेमो ! टेक डाऊन." साहेबांची थुंकीहि झेलण्यांत पारंगत असलेल्या घाटयांनीं त्यानीं सांगितलेला मजकूर कागदावर टिपून घेतला". ॲन्ड सी, पुट ए कॉपी ऑन हिज पर्सनल फाइल !"

मेमो घेण्यासाठीं त्याला कॅबीनमध्ये बोलावण्यांत आलें. नेनेसाहेब व घाटे त्याची वाट बघत होते. त्यानं साळसूदपणानं कॉपीवर सही करून मेमो स्वीकारला. दुसऱ्याच क्षणीं डोळयाचं पातं लवतं न लवतं तोंच त्यानं हातांत आलेल्या कागदाचे बारीक बारीक तुकडे करून त्यांच्यासमक्ष जवळच्या टोपलींत फेंकून दिले. सुब्रमण्यम्नं दिलेली त्या मेमोची कॉपी पॅंटीच्या खिशांत सुरक्षित होती. काय घडतं आहे हें त्यांच्या नीटसं लक्षांत आलं नाहीं. तेवढयांत साने तेथून निघून गेलाहि. साहेब नुसते आ वासून बघतच राहिले. घाटयांचा चेहरा तर अगदीं पाहाण्यासारखा झाला होता.

संध्याकाळपर्यंत त्यानं कामाला हात लावला नाहीं. तो विमनस्क मनःस्थितींत स्वस्थ बसून राहिला. ऑफिसच्या बंदिस्त व रोगट वातावरणाचा त्याला उबग आला. जीवनाचा नव्यानं अर्थ लावण्याचा संघर्ष त्याच्या अंतर्मनांत चालू होता. जीवनाचा नवीन अर्थ... जीवनाचा नवीन अर्थ......होय! सद्य जीवनाचा त्याग....आमूलाग्र बदल ! बदल !! बदल!!! त्याचं मन आक्रोश करीत होतं.

अचानक झालेल्या मोठ्या गलक्यानं त्याची विचारमालिका तुटली. डोकं खालीं वांकवून त्यानं खिडकीतून बाहेर पाहिलं. लोकल दादरला उभी होती. चढणाऱ्या व उतरणाऱ्या प्रवाशांची दरवाजापाशीं नेहमीचीच झुंबड व झोंबाझोंबी चालली होती. एव्हाना पत्त्यांचा डाव ऐन रंगांत आला होता. भिडू मंडळीचे कॉल्स जोरांत चालू होते. ऑफिसच्या यंत्रणेमुळं मरगळलेलं जीवन कांहीं क्षण विसरून ब्रिज व रमीच्या डावांत निसटणारा जीवनरस लुटत होते. डब्याच्या दुसऱ्या टोंकाला फेरीवाल्यांचा व भिकाऱ्यांच्या कर्कश गाण्यांचा आरडा चालू होता. मधूनच भांडणाच्या शाब्दिक फैरी झडत होत्या. या दैनंदिन जीवनाचा सान्याला कमालीचा वीट आला. त्याचं मन स्वैर धावूं लागलं. त्यानं त्याला लगाम घातला. डोळे बंद केले. तो अंतर्मुख झाला. तुटलेली विचारमालिका तो पुन्हां जुळवूं लागला.

विचार जुळत होते. भूतकाळातील घटनाचित्रं त्याच्या डोळ्यासमोरून पुढं सरकत होतीं. त्यांच्या पुनर्दर्शनानं त्याचं डिवचलेलें मानी मन विद्रोहाच्या आगीनं दग्ध होत होतं. जखमेवरच्या खपल्या निघाल्या जाऊन त्यांतून असह्य वेदना उठूं लागल्या. जुन्या आठवणी त्याला गतायुष्याच्या संगतींत घेऊन जात होत्या. आठवणीच्या गुंतावळयांत त्याला कोंकणातलं आपलं घर दिसूं लागलं. तात्या, आई, भीमात्या, मीरा, शरद व छोटी कुंदा हीं सर्वांच्या सर्व त्याला

दिसूं लागलीं. विभाकर त्यांच्यात थोरला. सगळ्यापासून दूर....दूर ...मुंबईला..... ! पोटाच्या मागं..... !

पंधरा वर्षांची नोकरी सोडून विभाकर चे वडिल कोकणांत आले. दम्याचा विकार अधिकच बळावल्यामुळं त्याना मुंबईत राहाणं दुरापास्त झालं.

विभाकर त्यावेळीं अकरावींत होता. मीराचं वय लग्नाचं झालं होतं. चालत आलेली एक संधि साधून त्याच्या वडिलानीं तिला उजवली. मुंबईहून आणलेला पैसा लग्नकार्यात खर्च केला.

एस्. एस्. सी. परीक्षेंत विभाकर चांगल्या गुणांनीं पास झाला. पैशांच्या अभावीं अर्थात पुढील शिक्षण घेणं अशक्य होतं. घरची थोडीशी शेतीवाडी होती. एवढचावर पुढील प्रपंच चालवणं कठिण होतं. इतक्यांची गुजराण कशी व्हायची ? नोकरी सोडून आलेले वडील... पाठचीं भावंडं...... समस्या मोठी विकट होती.

घरून विरोध असतानाहि तो थेट मुंबईला आला. त्यानं नोकरी धरली. अशा प्रकारं ऑफिसच्या कारकुनींत पांच वर्षे गेलीं. या कालावधींत त्यानं स्वतःला नावडणारे बरेच प्रसंग पाहिले आणि अनुभविले. लाचारीच्या पोटीं निरिच्छतेनं विशिष्ट चाकोरीचं जीवन तो जगला. केवळ निरुपाय म्हणून. नाहीं तरी पदोपदीं अपमानीत जीवन कंठण्याइतकं खर्डेघाशींत आकर्षण तें कोणतं ? परवशतेचं दुःख त्याला सतत वोंचत होतं. हृदयाला घरं पाडीत होतं. परंतु त्याचा कांहीं उपयोग होण्यासारखा नव्हता. स्वतःचं पोट भरायचं आहे ना, चार पोटं पोसायचीं त ना, मग हालअपेष्टा भोगल्याच पाहिजे. मनोरंजनादि गोष्टी टाकल्या पाहिजे. आणि प्रसंगीं अर्धपोटीहि.......

सान्यानं या सगळचा गोष्टींशीं मुकाबला केला. न पेक्षां ऑफिसव्यतिरिक्त बी. ए. पर्यंतचा शिक्षणक्रम त्याला कसा पुरा करता आला असता ? चिकाटीच्या रथाला श्रम आणि त्याग या चाकद्वयाची योजना केली. तो स्वतः त्या रथाला जुंपला. आणि चार चौघांनीं पदवीधर म्हणण्याइतपत मार्गाक्रमण करीत आला......पदवीधर ? होय......केवळ पदवीधर ! शिरावर वज्राघात झाल्याचा त्याला क्षणभर भास झाला. या आठवणीसरशी त्याच्या हृदयाला पडलेली सर्वांत मोठी व खोल जखम पुन्हां स्त्रवूं लागली. डोकं सुन्न झालं.

त्याला आठवलं. कॉलेज शिक्षण चालू करण्या अगोदर ऑफिसकडून त्याला परवानगी काढावी लागली होती. जिवाचा केवढा आटापिटा करावा लागला होता त्यावेळी ! एखाद्याला शिक्षणाची आवड असली, इच्छा निर्माण झाली तर तो स्वतः सायास करील. तें साध्य करण्यासाठी धडपडत राहील. परंतु इथं माणसाच्या इच्छेला किंमत नाही. ऑफिसच्या कलानं आपल्या आयुष्याचे आराखडे तयार करावेत. जणु सर्वस्व गहाण टाकून केवळ यंत्रवत् हातपाय हालवावेत. व्यक्तिस्वातंत्र्याची केवढी ही गळचेपी ! व स्वेच्छेची निर्घृण हत्या !

—अन् परवानगी मिळाली तेव्हां त्याला किती आनंद झाला ! दुर्दैवानं इंजिनियर होण्याचं त्याचं स्वप्न धुळीला मिळालं होतं. आहे त्याच परिस्थितींतून वर येण्याचा त्याला नवीन मार्ग दिसत होता. बी. ए. ला क्लास मिळवण्यासाठीं तो अहर्निश झटणार होता.

आणि एकदां का बी. ए. च्या परीक्षेंत मनासारखं यश मिळालं कीं मग त्याला नोकरीची पर्वा नव्हती. दहा पंधरा शिकवण्या करून त्यानं एम. ए. पर्यंत मजल मारली असती. नंतर....... प्राध्यापक होण्याचं एक रम्य स्वप्न त्याच्या डोळ्यासमोर तरळूं लागलं.

केवळ मनसुब्यावर तो जगत नव्हता. त्याच्या मागं निश्चयाचं बळ आणि कष्टाचं सातत्य होतं.

—परंतु घडलं मात्र निराळंच ! दैवानंच जणूं त्याच्यावर कुरघोडी करण्याचा प्रयत्न केला. परीक्षेसाठीं तीन चार महिन्यांची रजा सांचवून ठेवून देखील शेवटीं जमतेम तीन आठवड्यांची रजा मंजूर झाली. रजचे अर्ज मंजूर करण्याचा अंतिम अधिकार अर्थात नेनेसाहेबांना होता. सान्यानं कधीं कुणाशीं उघड उघड वैर धरलं नाही. उलट रजेच्या अपेक्षेनं अधिक दक्षतेनं व नियमितपणानं काम केलं. पण त्याचं कांहींच चीज झालं नाहीं. नेमकं त्याच वेळीं डिपार्टमेंटमधील इतरांचेहि रजेसाठीं मुहूर्त निघाले. दुसऱ्यांच्या मार्गात मोडता घालण्याचा सान्याला कांहींच अधिकार नव्हता.

त्याचा जवळ जवळ अशांततूच तुटला. परंतु "प्रयत्नवाद्याला वैफल्याच्या भावनेला थारा देऊन चालत नाहीं" हें कुणा अनुभववंताचे बोल त्याला आठवले. धैर्य सोडून चालण्यासारखं नव्हतं. अभ्यासापायीं घेतलेले परिश्रम व परीक्षेची फी वाया जाऊं देण्याचा अविचारपणा त्यानं केला नाहीं. कठोर काळाचं जालीम कालकूट त्यानं निमूटपणं कंठाखालीं घातलं. तारण-मरणाचं द्वंद्व त्याच्या मनांत चालू होतं. परिस्थितीवर मात करण्याची महत्वाकांक्षा त्याच्या शरीराच्या रोमरोमांतून संचारत होती.

पुढंहि त्याचा ससेमिरा चुकला नाहीं. "दैवाची लीला अगाध आहे" म्हणतात हेंच खरं. तो रजेवर असताना बी. ए. ची परीक्षा अचानक लांबणीवर पडली. संपूर्ण बेतच फिसकटला. रजा वाढवून मिळण्यासारखी नव्हती. त्याला वाटलं, काळ तर आपली सत्वपरीक्षा घेत नाहीं ना ? त्यानं मनाचा हिय्या केला. अधून मधून क्यॅजुअल लीव्ह घेऊन परीक्षेला बसला. काळाचं आव्हान स्वीकारलं.

अन् शेवटीं होऊं नये तें घडलं. अवघ्या दहा गुणांनीं त्याचा क्लास हुकला. त्याच्या डोक्यावर जणु आभाळ कोसळलं. दैवदुर्विलास याहून निराळा असूं शकत नाहीं. आजवर उराशीं बाळगलेलीं अन् जोपासलेलीं भवितव्याचीं उत्तुंग स्वप्नं अशा रीतीनं शतशः विदीर्ण झालीं. मातींत मिळालीं. निरर्थक ठरलीं.

जखम ताजी होती. भंगलेल्या स्वप्नाचे अवशेष हृदयाचा अंतर्भाग विद्ध करून ठिकठिकाणीं रुतून बसले होते. त्यांच्या वेदनाच्या संवेदनाचीं कंपनं अजून जाणवत होतीं परतंत्राचं तीक्ष्ण शल्य हृदयाला सहस्त्रावधि छेद पाडीत होतं.

—आणि आजच्या घटनेनं तर त्याचा स्वतःवरचा ताबा सुटला. जिथं माणसाला माणूस म्हणून धड जगतां येत नाहीं; माणसाच्या कर्तृत्वाला पुरेसा वाव मिळत नाहीं; केवळ हाताखालच्या कर्मचाऱ्यांनीं सदा आपल्यासमोर नतमस्तक होऊन राहाण्याबद्दल प्रयत्नांची शिकस्त करणाऱ्या क्षुद्र साहेबाचं हें जग ! ज्याच्या संपर्कानं एखाद्या गतिमान वस्तुलाहि खीळ बसावी व सुवर्णाला हळूहळू गंज चढावा




असं हें कुजकं विषारी वातावरण ! व्यक्तिस्वातंत्र्याचे उघड उघड मुद्दे पाडून गुलामगिरीचे विजय-ध्वज त्यांच्या छाताडावर रोवूं पाहाणाऱ्या सत्ताधांच्या मक्तेदारीचें हें कुरण !

अनेक स्फोटक विचार त्याच्या मस्तकाचा कबजा घेऊं लागले. त्यानं अगदीं दृढनिश्चय केला. असल्या हीणकस आयुष्यक्रमाचा अंत केलाच पाहिजे. अधिक पैशांच्या मिषानं मानहानीनं जगण्यापेक्षां कमी पैशांत मानाचं आयुष्य कंठणं अनंत पटीनं श्रेयस्कर नव्हे का ? ठरलं तर मग ! विभाकराचीं विचारचक्रं जोरांत फिरूं लागलीं. प्राध्यापक होण्याचं त्याचं स्वप्न साकार झालं नाहीं. तरीसुद्धां त्याच जीवनाचं एक उपांग तो शिकवण्या करून अनुभवणार होता. कारकुनीच्या मानानं शतपटीनं प्रतिष्ठेचं जीवन तो जगणार होता. एक प्रकारच्या अनामिक ओढीनं ऊर भरून आला. शुभस्य शीघ्रम्. आतां विलंब करतां कामा नये. कंटाळवाण्या जीवनाचं रूळ बदललेच पाहिजे. आयुष्याची घडी अभिनव पद्धतीनं बसवली पाहिजे. विचारांतलं तत्व आचारांत आणण्यांत कुचराई करून उपयोगी नाहीं. उद्यांच्या उद्या राजिनामा लिहून द्यायला हवा. या प्रकारानं सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसेल. एका महिन्यानं तर कारकुनी या शब्दाला आपल्या आयुष्यांत मुळींच स्थान उरणार नाहीं. खर्डेघाशी करणारा म्हणून हिणवण्याची कुणाची छाती होणार नाहीं. नवीन ध्येयासाठीं नवीन लोकांशीं नव्यानं ओळखी कराव्या लागतील. त्यासाठीं अविश्रांत पायपीट करावी लागेल. सुरवातीला थोड्या अडचणी येतील. कांहीं ठिकाणीं मुद्दाम जुळतं घ्यावं लागेल. पण त्याचं काय मोठसं ? निदान बंधनांच्या दावणींत अडकलेला नसेन. त्यादृष्टीनं स्वयंभू, स्वतंत्र जीवनाचं महत्व कांहीं कमीं नाही ? आणि पैसा हवाच असला तर शिकवण्या ग्रायीं पैसा का कमी मिळतो? महिन्याकाठीं दोनशें तीनशें रुपये सहज मिळतील. तूर्त एवढे पुरेसे आहेत. त्यांतून पन्नास साठ घरीं धाडायला हवेत. स्वतःच्या खर्चासाठीं कितीसे लागतील वरं ? नंतर एखाद्या बँकेंत खातं..महिन्या महिन्याला पैसे जमा करणं...

—कुणाच्या तरी हटकण्यानं त्याची तंद्री भंग पावली. तो सावध झाला. समाधीच्या धुंद वातावरणांतून अलगद भोंवतालच्या कोलाहलांत एकजीव झाला. आसपासच्या खुणा त्याला पटूं लागल्या. त्यानं स्वतःला सावरलं व नजर वर करून पाहिलं. त्याच्यासमोर तिकिटचेकर उभा होता. तो त्याला विचारत होता,

"प्लीज तिकीट...."

विभाकरानं पॅन्टचे दोन्ही खिसे वरून चाचपले. नंतर उजवीकडील खिशांत हात घालून त्यानं पास काढला व टी. सी. पुढं धरला. तो दुसरीकडं वळला. या गडबडींत पासासोबत आंतर्देशीय पत्राची एक घडीही वाहेर आली. त्यानं यांत्रि तेनं ती घडी उघडली व अगतिकपणं मजकूरावरून नजर फिरवली—

—आणि तो जणूं काय स्वर्गातून खालीं भूमीवर धाड्दिशी आदळला. तें त्याच्या तात्याचें आजच दुपारीं आलेलं पत्र होतं. दुपारच्या प्रसंगामुळं त्याला तें वाचावसं वाटलं नाहीं. खिशांत तसंच पडून होतं.

तात्या आजारी होते. अंथरूणाला खिळून होते. डॉक्टरचीं विलं थकलीं होतीं. कसंही करून तीनशें रुपये पाठविण्याबद्दल आवर्जून

## स्पर्श तुझा



फुला फुलांच्या रसगंधांतुन
तरळत वाऱ्या संगे आला
फुलपंखीच्या पंखावरला
चित्ररंगसा तरंग झाला

मेघांच्या अन पडला आडुन
झुरमुरणारी सुषमा स्नेहल
वीणेचा झंकार सुरेला
स्वप्नखुळा अन् कंपित कोमल.

डोळ्या मधले भाव बैसले
बाहुलिच्या अन् आडोशाला
ओंठावरचे निरर्थ कांहीं
जपती मूक मण्यांची माला

चित्राचे संपले चित्रपण
कणाकणाला फुटलें अंकुर
स्वर लहरींना सजवुनि गेला
स्पर्श विजेचा.....स्पर्श तुझा तर....

—निर्मला देशपांडे

लिहिलं होतं. त्याच्यापुढं मोठा पेंच पडला. पैशांची तर तजवीज करायला हवी. पण एकदम ते आणायचे कोठून ? त्याच्यापाशीं कुठं होती एवढी शिल्लक ? शेवटीं एकच पर्याय त्याच्यासमोर बाकी होता तो म्हणजे—

—अन् ऑफिसच्या आठवणीनं त्याला दरदरून घाम सुटला. फिरून त्याच्या डोळ्यांपुढं ऑफिसचा चौकोन तरळूं लागला. ते साहेबांचं कॅबिन.... घाटयांचं टेबल, त्यांची तुंदिल तनु आणि फेंदरं नाक.... कंबरेपासून वाकून बसलेली कारकून मंडळी.... खणखणणारे टेलिफोन्स..... वारंवार किरकिरणाऱ्या कर्कश विद्युत् बेल्स.... टाईपरायटर्सचे टपटप् आवाज.... या सर्वांनीं व्यापून सुस्तावणारे वातावरण आठवून त्याचं अंग शहारलं. त्याच्या डोळ्यापुढं अंधारी आली. त्याला एक चित्र दिसूं लागलं. घाटयांच्या टेबलासमोर विभाकर साने लाचार व दीनवाणी मुद्रा करून उभा होता. त्याच्या हातांत प्रॉव्हिडंट फंडामधून कर्ज काढण्यासाठीं वापरला जाणारा फॉर्म होता. घाटे त्याला रागीट नजरेनं दटावणीच्या स्वरांत विचारत होते,

"गेल्या वर्षी काढलेल्या कर्जाचे हप्ते अजून चुकते व्हायचेत साने !"

"ठाऊक आहे मला" त्यानं आवंढा गिळीत म्हटलं. काय करणार.....? वडील फार आजारी आहेत !"

यावर घाटे मोठमोठ्यानं हंसत असल्याचा त्याला भास झाला. त्या हास्यांत आसुरी आनंद असल्याची तीव्र जाणीव झाली. दुःखार्द्रतेनं त्याच्या डोळ्यांच्या कडा पाणावल्या. हृदय विषादानं भरून आलं...........

स्टेशन सोडून लोकल वेफाम धांवत होती आणि विभाकर सान्याचीं विचारचक्रं त्याहिपेक्षां जास्त .....! ●●●

# पानपुरी

**चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण**

## फौजदार आणि गाणें

कोल्हापूरला कोंकणची नवरी या नाटकाचा प्रयोग होता. त्यांत एकाला फौजदाराची भूमिका देण्यांत आली. रंगमंचावर जायचें आणि अटक करायची, एवढेंच काम त्याला होतें. तो 'म्हणाला, हें काम करीन—पण एका अटीवर! मला एक पद म्हणायची संधि दिली पाहिजे.'

फौजदार आणि गाणें !—हा प्रकार विचित्र होता. पण नाटक करणारीं माणसें अडलीं होतीं. त्यांना ही अट मान्य करावीच लागली. त्या दिवशीं फौजदारसाहेबांनीं रंगमंचावर प्रवेश करून एक गाणें ठोकलें अन् मग अटक केली.

—आतां या असल्या हौसेला काय म्हणावें!

●●●

## आणखी एकदां म्हण

कोल्हापूरच्या शुगर मिलमध्यें आलेल्या पाहुण्यासाठीं 'एकच प्याला'मधील दोन प्रवेश करुन दाखविण्यांत आले. सिंधूची भूमिका कान्होपात्रा या नटीनें केली होती. तिचें गाणें ऐकून एका पाहुण्यानें टाळी दिली पण एक टाळी म्हणजे काहीं 'वन्स मोअर' नव्हे! कान्होपात्रा तें गाणें पुन्हां म्हणेना. त्या वेळीं बाबासाहेब झालेला नट म्हणाला, 'बेटा सिंधू, आणखी एकदां हेंच गाणें म्हण पाहूं!'

गडकऱ्यांनी 'एकच प्याल्यां'त बाबासाहेबाच्या तोंडीं एकहि वाक्य घातलेलें नसलें तरी कोल्हापूरचा हा बाबासाहेब बोलला !

●●●

## चांगलें नाटक

चांगलें नाटक कशाला म्हणावें, हें सांगतांना पु. ल. देशपांडे म्हणाले, "जें नाटक पाहतांना तंबाखू खाणाऱ्या माणसाला आपल्या चंचीची आठवण होत नाहीं, तें नाटक चांगलें आहे, असें खुशाल समजावें!"

चांगल्या नाटकाच्या संदर्भात पु. ल. म्हणाले, "रामावरचें चांगलें नाटक नाटककारांत राम असल्याविना लिहिलें जाणार नाहीं."

भावणें पाठ न करतां आयत्या वेळीं वेळ मारून नेऊं, अशा भावनेनें रंगभूमीवर जाणाऱ्या नटांबद्दल बोलतांना पु. ल. म्हणाले, "आयत्या वेळीं फक्त एकच गोष्ट होऊं शकते—फजिती!"

●●●

## माणूस म्हणून सर्टिफिकेट

पुण्याला किर्लोस्कर थिएटरमध्यें 'राजपूरकर नाटक मंडळीं'चा मुक्काम होता. तेथें कंपनीच्या मालकांना भेटण्यासाठीं एकदां केशवराव दाते गेले असतांना बसाप्पा या नटानें त्यांना अडविलें आणि म्हटलें, "दातेसाहेब, आम्ही माणूस आहोंत, असें एक सर्टिफिकेट तुम्ही लिहून द्या."

"असलें विचित्र सर्टिफिकेट तुम्ही कां मागता?" केशवरावांनीं विचारलें. त्यावर बसाप्पा म्हणाला, "मालक महिन्यांतून तीस तीस खेळ करून आम्हाला राबवीत आहेत. जनावरांप्रमाणें आम्हाला राबवून घेतलें जात आहे. म्हणून तुमचें सर्टिफिकेट हवें. तें मालकांना दाखवूं आणि सांगूं कीं आम्हाला सुटी–विश्रांति या गोष्टींची गरज आहे."

●●●

## उचलून आणा

नाटकाची तालीम करायला टाळाटाळ करणारीं मंडळी आजच्याच जमान्यांत आहेत, असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. पूर्वींहि अशी माणसें होतींच. 'महाराष्ट्र नाटक मंडळीं'तील प्रसिद्ध नट त्रिंबकराव प्रधान यांना तालमीचे कष्ट घेणें आवडत नसे. अन् गणपतराव भागवतांची तालीम तर फार सक्त, फार कडक. त्रिंबकराव तालीम टाळूं लागले. निरोप पाठवूनहि ते येईनात. पण भागवत चिकाटी सोडायला तयार नव्हते. त्यांनी दोन माणसें पाठविलीं आणि त्रिंबकरावांना उचलून आणा, असा हुकूम दिला.

ही मात्रा बरोबर लागू पडली—त्रिंबकराव तालमीला उपस्थित राहिले.

●●●

## घरींच तालीम !!

'राजपूरकर नाटक मंडळी'मधील बसाप्पा नांवाचा नटहि तालीम करण्यास नाराज असे. वारंवार सांगूनहि तो तालमींना हजर राहिना. त्यामुळे चिडून एके दिवशीं कंपनीचे मालक बाजीराव राणे यांनीं बसप्पाच्या मुक्कामीं पेटी तबला वगैरे साहित्य नेवविलें आणि त्याची तालीम (पंचासह) तेथें घेतलीं. या प्रकारामुळें खजील होऊन तो तालमींना हजर राहूं लागला.

—वा. य. गाडगीळ



महाकवि–द. रा. बेंद्रे

महाकवि बेंद्रे यांची मराठी ही मातृभाषा आहे. पण दैवयोग असा कीं त्यांनीं कानडीचें साहित्य समृद्ध व सालंकृत केले. गेलीं दोन अडीच दशकें त्यांनीं मराठीतूनहि गद्य-पद्य लेखन केले. त्यांचे मराठी-कानडीवर सारखेंच प्रभुत्व असून वाणीचे 'वाङ्मय' आणि लेखणीचें साहित्य बनण्याची प्रचंड क्षमता त्यांच्या आविष्कारांत प्रत्ययास येते. नुकतीच त्यांची मुंबईच्या संघमंदिरांत 'ब्रह्मार्पण' या समान शीर्षकाची 'ज्ञानेश्वर घराणे', 'गडकऱ्यांचे एकच प्याला' आणि 'कलात्मक जीवन', अशी तीन दिवस तीन व्याख्यानें जी झाली ती गुंग आणि धुंद करणारी ठरली असे द. रा. बेन्द्रे म्हणजे मराठी–कानडी साहित्य संस्कृतीचा सोनेरी दुवा आहेत.

महाकवि बेंद्रे ह्यांच्याशीं करूं या आतां संवाद

# बेंद्रे सूक्त

काव्य आणि तत्वज्ञान ह्यांचा अपूर्व संगम

सोनें पाहून हृदय खुलेल कीं गुलाबाचे फूल पाहून ? भुलण्यांत आणि खुलण्यांत भेद आहे. गळयांत सोन्याचे दागिने वाहणाऱ्यांनाहि फूल हे शिरोधार्य आहे. प्रेमाच्या भाषेत फुलाचे स्थान मोठें आहे हे यौवन सहज भावनेने उद्दीप्त झालेल्या कुणालाहि कळते.

☆☆

दुःख गिळलें तर रोग होतो. दुःख सुद्धा सुखा प्रमाणे भोगून टाकले पाहिजे.

☆☆

साहित्य शब्दाने जड आहे पण अर्थाने अमर आहे. आणि साहित्यातील शब्दार्थाची ही जोडी आपल्या दांपत्याच्या समरसतेने नित्य नवी अशी सृष्टी निर्माण करते. राम-सीता या दांपत्याचा बिघाड करून जो रावण आपली अनिर्बंध विषयवासना तृप्त करूं पाहत आहे त्यांत श्री वाल्मीकीच्या आर्ष दृष्टीला विश्वसंहाराचे बीज दिसले व तसल्या संहारकाचा संहार करणारा राम धर्म प्रतिष्ठापनेचा अवतार वाटतो. आपण शब्दार्थ-दांपत्याचे बीज रहस्य ओळखूं तर शब्दाचा मंत्र बनेल आणि अर्थ केवळ मानसिक आकृति न राहतां सृष्टिरूप होईल आणि अशा मंत्रवाणीतूनच नवी सृष्टी निर्माण होते.

☆☆

साधुसंत आपल्याच अनुभवाचे उद्‌गाते आहेत. कवीच्या साहित्यांत केवळ स्वानुभाव नसतात. ते सहानुभूतीने वाढवलेले असतात.

☆☆

कवि रस आणि विरस दोन्ही जाणतो. परन्तु दोन्हींच्याहि आहारीं जात नाही. हारीं न जाणे एवढेंच कवीचे लक्षण नव्हे. काव्यशक्ति म्हणून कांहीं जादा आहे. Lear नाटक आणि शेक्सपिअरची राहणी यांच्यांत खराच फरक आहे. ध्वन्यात्मक शब्द व अर्थानुरोधी शब्द यांत भेद आहे. रसिकहि बोलतो आणि अरसिक माणूसहि बोलतो. पण तेंच कांहीं काव्य होत नाहीं. परानुभूति ही स्वानुभूतीला निकट आणण्याकरतां जे सहानुभूतीचे तत्त्व तें कवींत असून शब्दांतून सृजन करण्याची स्फूर्ति त्याला मिळते. ☆☆

आईबापांत देव पाहणें व देवांत आईबापांचा साक्षात्कार करून घेणें हा विठ्ठल संप्रदायाचा महिमा समजला पाहिजे. ☆☆

वात्सल्य गर्भित शृंगार 'रतीकरता रती' म्हणणाऱ्या कामुकतेहून व्यापक व चिरस्थायी आहे हे कामुकांनाहि मान्य होईल. ज्या कामुक प्रमुखाना हें पटणार नाही ते मुळी वात्सल्याच्या वाटेत न शिरता आपल्या 'निष्काम' आणि 'निष्फल' क्रीडेंतच दंग राहतील ! त्यांचा संहार उपसंहारहि तियेंच आहे. शृंगार जेथे विराम पावतो तेथून वात्सल्याचा उगम आहे–होतो हे बऱ्याच कुटुंब वत्सलांना माहीत आहे.

☆☆

दुर्बिणींतून पाहतो काय
दूर दूर दूर
पायाजवळ आला पाहा
पापाचा हा पूर

●●●

[टीपः – श्री. दा. गो. देशपांडे संपादित महाकवि द. रा. बेन्द्रे यांच्या मराठी गद्य-पद्याचा संग्रह नुकताच प्रकाशित झाला त्या 'संवाद' पुस्तकातून]

# कुंतीचा गर्भ

—वा. रा. कान्त

**ज्या नव्या जीवनाची स्थापना कुंतीच्या हृदयांत झाली होती, त्याच्या अनुभवाशीं तिला इमान राखतां आलें असतें तर—**



**एका** सकाळीं कुमारीच्या चकित डोळ्यांनी कुंतीने सूर्योदय पाहिला आणि त्यावरोबरच तिच्या जीवनांत दुःख उगवलें.

तें सकाळचे सोनेरी ऊन डोळ्यावाटे तिच्या शरीरांत उतरलें. नसांनसांत, रक्तांतून रेशमी गरम लहरी सळसळत गेल्या. ओठावरील किरणाच्या सुखदोष्ण स्पर्शाने, कुठेतरी, पोटांत खळगा पडला; आणि तिथें हिमशिखरांवरून झुळझुळत वाहणाऱ्या हिमालयाच्या झुळका घेऊन येणाऱ्या गंगेच्या लाटांचा गारवा पसरला. पदरांतून अंगाला झोंबला. त्यांत कैलासांतील किन्नरींच्या चंदनी कुच-लेपांचा चुरगळलेला धुंद गंध घपापत आहे, असें तिला वाटलें; आणि त्या गारव्यांत, तृप्तकाम अप्सरांच्या श्रमखिन्न निश्वासांतली विश्रब्धता तिला स्पर्शून गेली. कांठावरून घसरणारा एक किरण उरोजांशी थांवला. आणि तिच्या वक्षस्थळाच्या वर्तुळांत हजारों मोरपिसांचा स्पर्श थरथरला. त्या थरथरण्यांत, त्या उन्हांत वीज देखील असावी. तें ऊन आता चाफेगौर कातडीवरच थांबलें नाहीं. आंत शिरून अंगांगातून निथळूं लागलें. वाहेर तें ऊन जरतारी पांघरूण बनलें, तर आंत–अंतरंगांत सुखाच्या चंदेरी धारा बनून झिरपलें. एका क्षणभरांत, तिचीं कानशिलें, त्यावरचे कृष्ण कुरळ, गालांवरचीं कमळें, खांद्यावरचें सुवर्ण, सर्व सर्व तापलें; आणि त्याचीच एक ऊष्ण रेखा जाळीत, चरत बेंबीपर्यंत आली. तेथून त्यांच्या ज्वाला हृदयांत, कुशींत, कमरेंत, मांड्यांत, मांड्यामधील जांभळ्या रेषांत, चांदण्याच्या गोंदणांत चोहींकडे सरसर पसरल्या. सर्व अंग एकदम पेटून उठलें आणि विझलें. पापण्याच्या कडा ओल्या झाल्या. अतीव मधुर गाणें ऐकल्यानंतर येणाऱ्या आनंदाचे थेंब पापण्याच्या केसर कांठाशी सांवळले. रित्या हृदयांत चंद्र उगवला. चोळी भिजून चिंब झाली. निरीची गांठ ढिली पडलीशी वाटलें तर कमरेवरच्या खेंचलेल्या वस्त्राच्या चुण्या ओल्या झाल्याप्रमाणें मांड्याला–नितंबाला चिकटल्या; आणि सर्व गात्रें जड शीथिल झालीं: फुलांनी डंवरलेल्या पण पावसांत भिजलेल्या डहाळ्याप्रमाणे.

कुंतीने असा सूर्य पाहिला. तसा सूर्य सर्वजणच पाहतात. पण कुंतीने तो सर्वांगाने पाहिला, अनुभवला, भोगला. तें धगधगतें, जीवनाचे सडे टाकणारे हिरण्यगर्भ असें सूर्य-बिंव पाहतांच तिच्या मनांत एका अनुभवाचा उदय झाला. एका नव्या स्वप्नाचा तिला स्पर्श झाला. तिच्या हृदयांत एका नवीन जीवनाची गर्भ-स्थापना झाली.

ती गोंधळली. घावरली. हा अनुभव तिला नवीन होता. ही कल्पना जुन्या शब्दांच्या चौकटींत वसत नव्हती. परंपरेचे संकेत आणि सामाजिक नीति नियमांची बंधनें तोडून हा अनुभव वाढणार होता, व्यक्त होणार होता. नवीनच लाट रक्तावर चढली होती. स्वप्नाचा नवीन गांव कांट्याच्या अणीवर वसला होता. हें स्वप्न, हें जीवन तिच्या पहिल्या परिचित जगाशीं जुळणारे नव्हते. जीवनाचा नवीनच अनुभव होता तो. तो तिला धरता आला नाही. भीतीने तें जीवन तिनें पाण्यांत लोटलें.

डोळ्यांत एक स्वप्न घेऊन ती धावली. धावता धावता आपल्या डोळ्याच्या काठाशीच थांवली. स्वप्नाची शीळ डोळ्यापाशीच संपते काय ? उन्हाने पेटणारी वास्तवतेची क्षितिजरेषा, स्वप्नील नजरेची जळती सीमा ठरावी असा नियतीचा शाप असतो काय ? की आपला दुर्बळपणा म्हणजेच ही नियति ? समाजाचे संकेत, परंपरेच्या वेड्या, नीतीचीं बंधने कुणी निर्माण केली ? आपणच ना ?– पण आपण म्हणजे तरी कोण ? मी ?– माझे वावा ?– माझी आई ? नाही नाहीं माझ्या आईबाबांना ही वंधने तोडतां येणार नाहींत. त्यांची कीर्ति. कुलरीत ! या अपकीर्तीच्या ज्वालांनी त्यांचा दाह होईल. आईतर दुःखाने प्राणच सोडील–आईबावांच्या मृत्यूला कारण होणारी मी चांडाळीण ! काय केलं मी हें ? अन् ते महर्षि, दुर्वास, ज्यांनी मला वर दिले. ते महर्षि दुर्वास मला काय म्हणतील ? त्यांनी दिलेल्या वराची मी विटंवना केली. पण जीवनांत वर देखील शाप कां होतात ? भास्करा, मी तुला तेज मागितलं आणि तूं मला असें जाळून टाकायचं ठरवलंस, अग्निशिवाय, जळाल्याशिवाय प्रकाशाचा अनुभव भोगता येऊं नये काय ? कुंती विचार करीत काठाशी किती वेळ उभी राहिली. अन् स्वप्नांतून निसटलेलें तें जीवन प्रवाहांत वाहूं



अनुक्रमणिका

लागले – आपले नांव सोडून, नाळ तोडून, तोडलेल्या नाळेचा देठ मिटतो, रक्त वाळते. पण सारे तिथेंच संपत नाहीं. गंगा वाहात होती. पेटी पुढे पुढे सरकत होती. मागे, लाटांतून, मासळ्या डोळे मिचकावीत होत्या.

कुंतीचे नेत्र अश्रूंनी मिटले होते. ओठावरील शब्दाच्या कानामात्रा पुसल्या होत्या. कुठलंच अक्षर वाचतां येत नव्हते. भवितव्यांत पेटी वाहात चालली होती. आणि पेटींतलें अर्भक डोळे मिटून झोंपले होते. मायेच्या हाताचा स्पर्शही त्याला नीटसा कळला नव्हता. धुळीने धुक्याने दिशा झाकळून धूसर झाल्या होत्या. त्या धूसरपणांत अपमानाची धूळ होती कीं अनौरसपणाचा कलंक होता. आणि वहिष्कृतांचा रितेपणा ? कोण देणार होतें याचें उत्तर ? एकाचें तर ते कळण्याचें वयच नव्हते आणि दुसऱ्याने आपले डोळेच मिटून घेतले होते.

कुंतीने डोळे उघडले, तेव्हां पुष्कळच पाणी वाहून गेलें होतें: तिच्या डोळ्यांतले अन् नदीतलें पण. आतां तिला समोर दिसत होता वाळवंटांत उभारलेला भव्य क्रीडामंडप. पलीकडे भूतकाळाची नीळ झाडीत यमुनेचे पाणी वाहात होते. त्यांत हस्तिनापुरीच्या राजप्रासादाचीं सुवर्ण-शिखरें प्रतिबिंबित झाली होती आणि क्रीडा-मंडपातून येणारे शस्त्राचे खणखणाट धनुष्याचे तीक्ष्ण टणत्कार अत्यंत वेगाने, त्वेषाने आसमंतांत घुमत होते. अन् तरवारीच्या पात्याप्रमाणे वाऱ्यांत घुसणारे धनुष्याचे ते टणत्कार पाण्यांत चमचमणारी राज-धानीच्या सुवर्ण कळसाची हीं प्रतिबिंबें कापून नेतील असें उगीचच वाटत होते.

त्या उद्दाम टणत्कारांच्या मागोमाग किंचित वृद्ध पण अधिकार-वाणीने उच्चारलेले शब्द वाऱ्यावर तरंगले. "एका सूतपुत्राला राजपुत्राशी द्वंद्व करता येणार नाहीं. तो त्याचा अधिकार नाहीं."

कुंतीने पाहिलें समोर क्रीडांगणांत एक अज्ञात कुमार धनुष्य सज्ज करून उभा होता. त्याची मान सोन्याच्या कर्ण-कुंडलासह खालीं वांकली होती.

अर्जुन उपहासानें हंसला. पांडवाचा कक्ष हास्याच्या खदखदाटांनी व आरोळ्यांनी निनादून गेला.

पण कुंतीच्या सर्वांगातून लज्जेची अपमानाची ज्वाळा पसरली. नकळत, घामेजलेल्या कपाळावरून तिनें हात फिरवला अन् तळवा न्याहाळला. त्या तळव्यावर कुठेंच कलंकाच्या रेषा उमटलेल्या तिला दिसल्या नाहींत. तरीहि वीरश्रीनें फुरफुरणाऱ्या कर्णाच्या तेजःपुंज देहाकडे तिला नीट पाहता आलें नाहीं. त्याच्या सर्वांगाला प्रेमाने कुरवाळणारी तिची नजर तुटलेल्या वाहूप्रमाणें खालीं कोसळली. पुन्हा एक तेजस्वी स्वर उसळला. पाण्यांतून उसळणाऱ्या मासळी-प्रमाणें—

"जन्माने नसला तरी पुरुषार्थानें मी तो अधिकार मिळवला आहे." कर्ण फुत्कारला.

डाव्या कक्षेंतून दुर्योधन धावत आला. आणि अंग देशाचा राजमुकुट त्याने कर्णाच्या मस्तकावर ठेवला. कौरवांच्या हर्षनादांनी आता आकाश भरले. पांडवांचा आनंद मलीन झाला. परंतु कुंतीच्या डोळ्यांत अभिमान उजळला. कुळाचा अंचल वाजूला सारून. आणि तिचे डोळे अश्रूंनी मिटलेले नव्हते.

राजमुकुट कर्णाच्या मस्तकावर चढला. पण त्याने 'हीनकुल' म्हणून केलेल्या अपमानाची त्याची जखम बुजली नाहीं. त्यांत सूडाच्या विषसर्पांनीं अंडीं घातलीं. पांडवाना राज्यहीन करण्याच्या इच्छेने, दुर्योधनावरोवर, त्याच्याही मनांत पेट घेतला. द्रौपदीच्या लज्जाहरणाने मनाचा घाव भरण्याचा त्याने यत्न केला. द्रौपदीसह पांडवांना दास करण्याचा प्रयत्नही असफल झाला तेव्हां त्याने निः-पांडवी पृथ्वी करण्याची प्रतिज्ञा केली. परंतु त्याच्या मानी अंतःकर-णाची जखम तशीच ठणकत राहिली. त्याचा आत्मा अहंकाराच्या असफलतेच्या वाणांनी जर्जर झाला. क्रोधाची मत्सराची विजया-कांक्षेचीं अग्रें त्याला घायाळ करीत होती.

तशी कर्णाला जन्मतःच कवच कुंडलें लाभलीं होतीं, पण तीं वाहेरचीं होतीं. वाहेरून तो अभेद्य होता. परंतु आंतून—हृदयांत—त्याला आंतर-संरक्षण नव्हतें. त्याचें हृदय अगदी उघडे हीनकवच होतें. त्याचा सहज भेद झाला. अपमानाच्या, दुःखाच्या, द्वेषाच्या, सूडाच्या यातनेने तो तळमळूं लागला. आपल्या अंतरंगाच्या या दुर्बलतेची कर्णालाही जाणीव होती. वाहेरच्या अभेद्य कवच कुंडलांमुळें आपले अंतर दुबळे झाले आहे असें त्याला वाटलें असेल काय ? म्हणूनच कवच कुंडलांचें दान मागणाऱ्या इंद्राला त्यानें तीं दान करून टाकलीं नसतील काय ? नाहीं तर, इंद्र हा आपला शत्रु आहे आणि कपटीपणाने हे दान तो मागतो आहे, हे ओळखून देखील कर्णाने आपली कातडी सोडून ती कवच कुंडलें त्याला दिली याची संगति लावायची ? कीं इंद्रापेक्षाहि मी थोर आहे, श्रेष्ठ आहे, असें त्याला जगाला पटवून द्यायचें होतें ? कीं या उदार दानानें, त्यागाने आपल्या आत्म्याला निर्भय, अभेद्य

व अजेय करण्याचा त्याचा हा निर्वाणीचा प्रयत्न होता ? परंतु या त्यागानेही त्याला आपले विनाशक रूप आटोपता आलें नाहीं.

कुंतीने नाकारलेल्या जीवनांतील सत्याला विनाशाचें जे भयंकर रूप प्राप्त झालें, तें आता कुणालाच आटपण्यासारखें नव्हतें. पुढे युद्धाच्या धुमश्चक्रींत, सूडाने पेटलेल्या कुरुक्षेत्राच्या दग्ध भूमींत कुंतीने हें सत्य स्वीकारण्याचा प्रयत्न केला. लज्जेसह, साऱ्या कलंकासह मातृत्व स्वीकारण्याच्या निश्चयाने ती कर्णाकडे आली.

कर्णालाही आईची ती हांक एकू आली. त्या हाकेंत स्वप्नांत पाहिलेली आई त्याला दिसली; आणि त्या शब्दांत रणकुंडांत जळणाऱ्या जगाला वांचवण्यासाठी धडपडणाऱ्या आईच्या आवाहनाचें करुण स्वर त्याला ऐकूं आले. 'बाळा कर्णा' म्हणून कुंतीने उच्चारलेल्या शब्दाच्या माधुर्यांत तो विरघळला. राज्य, युद्ध, विजय, कीर्ति या शब्दाचे अर्थ पाहातां पाहतां गळून पडले. सारे शब्द अर्थशून्य झाले, गळालेल्या पक्ष्यांच्या पिसांप्रमाणे.

"मग आई तूं माझा त्याग कां केलास ?" कर्णाने विचारले. लज्जेने कुंती व्याकुळ झाली. ती अवाक् मूक उभी राहिली.

तिला असें स्तब्ध पाहून कर्णाच्या लक्षांत आले कीं आपण ऐकिलेला आवाज आपल्या आईचा नव्हता. अर्जुनाच्या आईचा होता. एकाच काळजाची दोन शकलें करून दोघांत अंतर निर्माण करणाऱ्या, आणि कर्ण आणि अर्जुन यांच्यात द्वेषाची, विश्वसंहारक भेदाची धगधगती दरी निर्माण करणाऱ्या कुंतीचा तो शब्द होता. भीतीने, लज्जेने नवजीवन नाकारणाऱ्या, मातृत्वाचा इन्कार करणाऱ्या दुःखी स्त्रीची ती करुण साद होती– आता जीवनाने सत्याला साद घातली. परंतु सत्यानेंच जवळ येण्याचें नाकारलें.

"मी सारथ्याचाच मुलगा आहे. अन् राधा हीच माझी आई आहे." कर्ण स्वतःशीच मोठ्याने उद्गारला. त्याच्या जीवनाचें तेंच सत्य होतें. त्याचा इन्कार त्याला करायचा नव्हता. राधेने त्याला धुळींतून सावरले होते; त्याच्या उघड्या देहावर पांघरूण घातले होते.

कुंतीने त्याला राज्यपद देण्याचे वचन दिलें. पण त्याला राज्यपदाची अभिलाषा नव्हती. उच्च कुळाच्या गौरवाचीहि त्याला पर्वा नव्हती. अंतःकरणाच्या ओलाव्याला तो आसुसला होता. भंगलेपणाच्या धगीने जळणाऱ्या एकाकी जीवनाचा अंत करण्याची त्याला घाई झाली होती. तो म्हणाला—

'आई, एका रात्रीं तूं मला अगदी नागडा उघडा पाण्याच्या प्रवाहांत एकटा सोडलें होतेंस ना ? आतां पुन्हा एकदा तसाच मनाचा घडा कर आणि मला अपमानाच्या आणि कलंकाच्या धुळींत टाकून दे. पराजयाच्या आणि मृत्यूच्या गर्तेंतच लोटून दे मला. विजय तुझ्या अर्जुनाचाच आहे."

आपली लाज अंजुळींत घेऊन कुंती परतली. पांडवांच्या शिबिरांतील दिवे सकाळच्या प्रकाशांत आतां निस्तेज झाले होते; आणि अरुणोदयाबरोबर क्षितिजावर युद्धाची आग शिलगत होती. कुंतीने नाकारलेले सत्य संहाराचे रूप घेऊन, पांडवाचा, त्यांच्या कुळाचा, सगळ्या मनुष्य जातीचा, आणि कुंतीने हृदयाशीं कवटाळलेल्या दुसऱ्या सत्याचा नाश करण्याकरिता धनुष्य सरसावून धावून येत होते.

ज्या नव्या जीवनाची स्थापना कुंतीच्या हृदयांत झाली होती, त्याच्या अनुभवाशीं तिला इमान राखता आलें असतें तर मग जीवनांतील सत्य कदाचित असें 'कानीन' झालें नसतें. कुणी सांगावें? डोळ्यांत सूर्याचा गर्भ घेऊन चालणाऱ्या कुंतीला त्या स्वप्नांतलें सत्य कुठें कळाले होतें ?

• • •

---

( पान ८ वरून )

मंडळाची वर्गणी भरण्याचीहि त्यांना मारामार. पण काम पहाल तर प्रचंड. तो पहा त्यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनां'चा २२ खंडाचा भारा. काम करायचे भरपूर तसेंच जेवायचेंहि भरपूर. भातावर तूप व मध ओतीत अन् नंतर चवीचवीनें जेवीत. प्रसंगीं सयाजीराव गायकवाडांसारख्या बड्या संस्थानिकांची उधळपट्टीबद्दल खरडपट्टी काढण्यास ते कचरत नसत. त्यांच्या 'म. इ. सा.'च्या १ ल्या खंडाची प्रस्तावना आहे १२७ पृष्ठांची. त्यांच्या स्वयंप्रज्ञेची छाप त्यांत दिसतें. स्वतंत्र व संपादित मिळून १६–१७ ग्रंथ त्यांच्या नांवें आहेत. कुठलाहि विषय त्यांना वर्ज्य नव्हता. इतिहास, वाङ्मयशास्त्र, राज्यशास्त्र, भूस्तरशास्त्र, मानववंशशास्त्र, तत्त्वज्ञान, प्राचीनवस्तु–संशोधन, नाणकशास्त्र अन् अर्थशास्त्र वगैरे विषयांवर त्यांची रसवंती सुरू झाली कीं तिला खळ ठाऊक नसे. त्यांचे प्रखर टीकाकार आमचे प्रबोधनकार ठाकरे. पण श्री. राजवाडे १९२६ मध्यें निवर्तल्यावर ठाकऱ्यांनीं म्हटलें, 'गेल्या तीनशें वर्षांत असा माणूस झाला नाहीं.' राजवाडे जसे लोकविलक्षण तसा त्यांच्या शताब्दीचा प्रकारहि अजब. त्यांची शताब्दी १९६४ मध्यें होणार अशी भल्या भल्यांची कल्पना. पण त्यांचे शिष्योत्तम म. म. पोतदार यांना गेल्या वर्षी त्यांचा जन्म १८६३ मध्यें झाल्याचा साक्षात्कार झाला. आमच्या संशोधन संस्थांच्या कार्यतत्परतेचा हा पुरावा 'पेशवे' दप्तरीं नमूद करण्यासारखा आहे. गेल्या वर्षी तरी राजवाड्यांचा शताब्दी उत्सव सर्वत्र साजरा झाला हेंहि नसें थोडकें.

झांशीच्या राणीसाहेब, लक्ष्मीबाई यांचें मराठींत पहिलें विस्तृत चरित्र भरपूर आधारानिशीं लिहिलें एका पंचविशींतल्या तरुणानें. त्याबाबत त्याला प्रोत्साहन मिळालें लो. टिळकांकडून. पण थांबा त्यांची तिशींतली बहाद्दुरी सांगूया. १९०० सालीं (२०.३.१९००) नाना फडनवीसांच्या शतसांवत्सरिक श्राद्धानिमित्त 'केसरी'चा अग्रलेख, पुस्तकाची पंचवीस पृष्ठें भरतील एवढा मोठा होता. तो कुणी लिहिला आहे का माहित ? त्याचा थोडा भाग टिळकांनी व बराचसा भाग या तरुणानें लिहिला. यावरून त्याच्या अभ्यासाची कल्पना येईल. या तरुणाचें नांव रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस. ह्यांनी 'भारतवर्ष' व 'इतिहास संग्रह' हीं मासिकेंहि काढलीं. त्यांचें इतिहाससंग्रह बराच काळ टिकलें. तीस बत्तीस ग्रंथ यांनी लिहिले. स्वतःचा ग्रंथसंग्रहही नमुनेदार केला. प्रसंगीं पुस्तकाला पांचशें रुपये देण्यासहि यांनीं मागें पुढें पाहिलें नाही. सातारला ऐतिहासिक म्युझियमहि यांनीं स्थापिलें. संस्थानिक, सरदार, जमीनदार व इंग्रज अधिकारी ह्यांच्यावर आपल्या वाणीनें भुरळ पाडणारा ह्यांच्यासारखा संशोधक विरळा. इंग्लिश इतिहासकारांना यांनी कागद





पुरविले. कोल्हापूरच्या शाहूमहाराजांबरोबर विलायत प्रवासहि हे करून आले. एकंदरीत काय तर हे मोठे रुबाबदार संशोधक होऊन गेले. राजवाड्यांहून हे सहा सात वर्षांनी लहान. १९२६ सालीं ते निवर्तले.

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कपाटाचें कुलुप फोडण्यांत एक वल्ली गुंग झाली आहे. कोण आहे ती असामी ? हे महाराष्ट्र-सारस्वतकार वि. ल. भावे — ठाण्याचे रहिवासी. 'महाराष्ट्र सारस्वत' नि नेपोलियनचें चरित्र लिहून यांनी मोठा लौकिक मिळविला. पैशानें गर्भश्रीमंत पण खर्चाला हे फार कंजूप. यांनी नेपोलियन चरित्र लिहिलें खरें. पण त्यांस लागणारे संदर्भग्रंथ आणले मुंबईच्या रॉयल एशियाटिक लायब्ररीतून. ऐपत असून तत्संबंधीचा एकहि ग्रंथ यांनी विकत घेतला नाही. यांचे 'मराठी दप्तरा'चें कामहि नमुनेदार आहे. दुसऱ्या बाजीरावाचें हें भक्त. ही भक्ती इतकी पराकोटीची की त्यांनी त्याची तुलना नेपोलियनशीं केली. विद्वान खरे, पण लिहितांना फार घसरत. त्यांचे तुकाराम वर्णन संतापजनक आहे पण तें फार मार्मिक आहे. लक्ष्मीचा यांच्यावर वरदहस्त होता तसेंच सरस्वतीचें कृपाछत्रहि यांच्या मस्तकीं होतें. राजवाड्यांचे हे परम-मित्र. हे त्यांना घरी बोलवायचें. पण जाण्या-येण्याच्या भाड्याचें नांव नको—तें देतील तर शपथ. पेशाने व्यापारी, हौशीनें संशोधक अन् वृत्तीने रसिक अशी ही नमुनेदार व्यक्ति होती. वयानें हे पारसनीसांच्या बरोबरीचे. १९२६ सालीं ते निवर्तले. 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथामुळें यांचे नांव मराठी वाङ्मयांत चिरस्मरणीय झालें आहे.

ह्या पंचायतनाची ओळख करून दिली खरी पण दुसऱ्या दोन तोलामोलाच्या व्यक्ति राहिल्याच कीं. त्या म्हणजे रियासतकार सरदेसाई व सर यदुनाथ सरकार. दोघे एकमेकांचे परममित्र. दोघांचा पत्रव्यवहारहि पन्नास वर्षांचा. दोघांना आयुष्यहि दीर्घकाल लाभलें. सरदेसायांच्या १२ खंडांच्या रियासती डोळ्यांत भरण्यासारख्या. अभ्यासकांना त्या पाहिल्याशिवाय इतिहासाचा अभ्यास पुरा करता येणार नाही. पेशवे दप्तराचे ४५ खंड संपादित करून त्यांनी एक विक्रमच केला. संपूर्ण आत्मचरित्र लिहिणारे हे पहिलेच संशोधक. (हवे तर इतिहासकार म्हणूं. यांना 'संकलनकार' म्हणणारे महाभाग आहेतच.) मराठी इतिहास प्रकाशनांत यांची कामगिरी चिरस्मरणीय आहे. महाराष्ट्र सरकारनें अनुदान देऊन ढवळे प्रकाशनकडून यांच्या रियासती आतां नव्याने प्रकाशित कराव्यात. असेच यदुनाथ हे त्रिखंड कीर्तीचे इतिहासकार. यांचा ग्रंथसंग्रहहि विविध तऱ्हेचा अन् विपुल होता. आमच्या म. म. पोतदारांचा अन् यांचा उभा दावा. (अर्थात हे मतभेद वैयक्तिक नव्हते.) पण त्यांच्या निधनानंतर म. म. यांनी 'केसरी'त त्यांना जी श्रद्धांजली वाहिली त्यावरून त्यांची योग्यता ध्यानीं येते. औरंगजेब चरित्राचे पांच खंड, फॉल ऑफ दि मोंगल एंपायरचे ४ खंड व शिवचरित्र ही त्यांची प्रमुख अन् मौलिक ग्रंथसंपदा. त्यांच्या शिवचरित्राच्या तोडीचे चरित्र लिहिणारा वीर अजून झाला नाहीं. त्यांच्या शिवाजी चरित्राच्या ६ आवृत्त्या निघाल्या. ब्रिटिश अमदानींत 'सर'की मिळविणारे हे एकुलते एक इतिहासकार.

चला जरा मागें. सन १९१८ मधला प्रसंग. मराठी राज्य बुडाल्याला १०० वर्षे झाली म्हणून त्यानिमित्त मराठी राज्याचा आढावा घेणारा ग्रंथ प्रसिद्ध करावा अशी कल्पना एका गृहस्थांनी मांडली. अनेकांनी कामें वाटून घेतली. आमचे दत्तोपंत पोतदारहि त्यांत होते. पण कुणाच्याच हातून लेखनविषयक कसलेंच काम झालें नाही. तेव्हां कल्पना मांडणाऱ्या गृहस्थानीं एकट्याच्या हिमतीवर 'मराठे व इंग्रज' ग्रंथ लिहिला. त्या पुस्तकाला प्रस्तावना आहे खरेशास्त्र्यांची. हे ग्रंथकर्ते म्हणजे तात्यासाहेब केळकर. ते इतिहासप्रेमी अन् इतिहासाशीं संबंध ठेवणारे होते. खरेशास्त्र्यांच्या 'ऐतिहासिक लेखसंग्रहाची' मार्मिक परिक्षणें त्यांनीं 'केसरी'त लिहिली.








'मराठे व इंग्रज' त्यांनी लिहिलें तेव्हां टिळकांचे दौरे, होमरूलची चळवळ व 'केसरी' चे संपादकत्व वगैरे जबाबदाऱ्या त्यांच्यावर होत्या. पण कामें फार म्हणून ते अडून वसले नाहीत. वेळांत वेळ काढून त्यांनी 'मराठे व इंग्रज' हा अप्रतिम ग्रंथ लिहून टाकला. आमच्या म. म. पोतदारांसारखी वेळेच्या सबबीची ढाल त्यांनी पुढें नाही कधीं केली. भारत इतिहास संशोधक मंडळाचे ते अनेक वर्षे अध्यक्ष होते. त्यांचे सत्कार समारंभ सर्वत्र झाले पण मंडळांत त्यांचा सत्कार कधीं कां झाला नाही हा विषय संशोधनाचा म्हणून बाजूस ठेवू.

मंडळाच्या जवळच एका खोलींत कोण बसले आहेत ते दोघे ? एक आहेत रियासतकार अन् दुसरे चिंतामणराव वैद्य. ते रियासतकारांना कॉफी देत आहेत.त्यांचा महाभारताचा अभ्यास दांडगा. त्यांचे 'मध्ययुगीन भारत' ग्रंथाचे तीन खंड विद्वज्जनांत मान्यता पावले. हे कादंबरीकारहि होते बरं कां! त्यांची दुर्दैवी 'रंगु' कादंबरी मनाला चटका लावणारी ठरली. इंग्रजींत यांनी शिवचरित्रहि लिहिलें. हे इतिहासाचे गाढे अभ्यासक. मंडळाचे ते अनेक वर्षे अध्यक्षहि होते. कल्याण येथें १९३८ सालीं हे निवर्तले.


डॉ. यदुनाथ सरकार

यदुनाथ सरकारांना 'शिवजन्मतिथी' विषयीं जाहीर वाद करण्यास आव्हान देणारे द. वि. आपटे हेहि इतिहासाचे एक गाढे अभ्यासक. 'श्रीरंगपट्टणावर मोहिम', 'महाराष्ट्र इतिहासमंजिरी', 'संशोधकाची छोटी जंत्री' असे मिळून एकंदर १९ ग्रंथ त्यांनी लिहिले. त्यांतले कांहीं संपादित आहेत. ह्यांचेच शिष्य शेजवलकर. 'मराठा मंदिर' या संस्थेने यांच्याकडे शिवचरित्र लिहिण्यास दिलें. त्यांच्या निधनानें ते अपुरे राहिलें पण साधन ग्रंथ म्हणून नमुनेदार आहे. फाळणीच्या निमित्तानें 'पानिपत' ग्रंथांच्या प्रस्तावनेत (ही प्रस्तावना नंतर छापण्यांत आली. या प्रस्तावनेस प्रकाशकांचा विरोध झाला ) त्यांनी गांधीं-नेहरूंना जबर टोले हाणले. त्यावरून निःपक्षपाती इतिहासकार म्हणून त्यांची योग्यता फार मोठी. अलीकडच्या काळांत यांच्याएवढा मराठी इतिहासाचा अभ्यास करणारा अभ्यासक आढळत नाही. डेक्कन कॉलेजांत हे इतिहासाचे प्राध्यापक होते. त्यांच्या निवृत्तीनंतर अन् आतां निधनानंतरहि त्यांच्या तोलाचा प्राध्यापक डेक्कन कॉलेजला मिळत नव्हता. त्यांची ती खुर्ची अलीकडील व दुसऱ्या अभ्यासकांना देण्यांत आली.

डॉ. सुरेन्द्रनाथ सेन यांचे विस्मरण करून चालणार नाही. मराठी इतिहासाबाबत त्यांची कामगिरी भरीव आहे. पोतदारांना महामहोपाध्याय पदवी मिळाली ती यांच्या शिफारसीमुळें. 'फॉरिन बॉयग्रफीज ऑफ शिवाजी', 'अॅडमिनिस्ट्रेटिव्ह सिस्टिम ऑफ मराठाज्' व 'मिलीटरी सिस्टिम् ऑफ मराठाज्' वगैरे ग्रंथांत त्यांच्या मराठी इतिहासांच्या व्यासंगाचें प्रतिबिंब दिसून येतें. 'अठराशें सत्तावन' हा त्यांचा अलीकडला ग्रंथहि नांव घेण्यासारखा आहे. पोतदारांच्या षष्ट्यब्दयपूर्तीच्या वेळीं त्यांनी पुण्यास मराठींत एक तास अस्खलीत भाषण केलें. त्या निमित्त प्रसिद्ध झालेल्या पोतदार गौरव ग्रंथाचें संपादनहि त्यांनीच केलें. पण त्यांच्या निधनानंतर त्यांना लेखाची श्रद्धांजली वाहण्यास आमच्या महामहोपाध्यायांना वेळ झाला नाहीं याबद्दल कुणासहि हळहळ वाटेल. दोघांचा स्नेह अतूट होता म. म. ना ते कौतुकाने 'पेशवे' म्हणत.

मंडळाचे एकनिष्ठ सेवक अन् प्रख्यात् इतिहास संशोधक शं. ना. जोशी यांना विसरून कसे चालेल ? इंग्रजी शिक्षणाचा संस्कार नसूनहि यांनी संशोधन क्षेत्रांत मोठा लौकिक मिळविला.पुणें विद्यापीठाच्या बहिःशाल व्याख्यानमालेंत बोलण्याचा बहुमान यांना लाभला अन् यांच्या ऐतिहासिक ग्रंथांना सरकारी पारितोषिकेंहि मिळालीं. ग्रंथसंग्रहाचे हे मोठ नादी. रियासतकार सरदेसायांनी 'पेशवे दप्तर'चे खंड कांही मित्रांना भेट दिले. यांना ही गोष्ट समजल्यावर 'या मित्रांहून माझी योग्यता कमी आहे कीं काय ? मग ग्रंथ माझ्याकडे कां आले नाहींत ?' असें पत्र लिहून त्यांनी सरदेसायांना जाब विचारला. तेव्हां सरदेसायांनी ४५ खंडांची भेट यांना आनंदाने दिली.

आतां थांबले पाहिजे. मराठी इतिहासाचें कार्य व्यापक. या क्षेत्रांत काम करणारी माणसें संख्येनें कमी पण गुणवत्तेनें गुणज थोर ठरलीं. इतरांची ओळख पुन्हां केव्हां तरी करूं. सरदेसायांच्या जन्मशताब्दीप्रित्यर्थ मराठी इतिहास क्षेत्रांतील दिवंगत व्यक्तींच्या धांवत्या स्मरणाचा हा प्रपंच केला. इतिहासाचार्य राजवाडे यांचे शिष्योत्तम म. म. दत्तोपंत पोतदार यांनी वरील सर्व व्यक्तींचे स्मरण ठेवून आपल्या शिवचरित्राच्या संकल्पाचें विस्मरण पडूं देऊं नये हीच माझी सरदेसाई शताब्दी प्रसंगीं प्रार्थना! ! ●●●

## स्टेजवरचा विदुषक

संस्कृतचा तास होता. एका नाटकांतल्या विदुषकाबद्दल सर बोलत होते. मुलांचा गोंगाट चालू होता. सर चिडून म्हणाले,

'स्टेजवरच्या' "एका" विदुषकाकडे लक्ष द्या. वर्गांत आणखी विदुषक नकोत.'

मुलें जोरांत हसूं लागली. 'नाटकांतल्या' म्हणण्याऐवजीं 'स्टेजवरच्या' म्हटल्याची चूक प्राध्यापकांच्या लक्षांत आली खरी पण वेळ निघून गेली होती.

–माधव अत्रे

## "तुझ्याच शोधांत"

'सौभद्र'चा एक प्रयोग चालला होता. छोटा गंधर्व कृष्णाची भूमिका करीत होते. दुसऱ्या अंकांत बळराम म्हणाला, 'अरे या कृष्णाला तीर्थ द्या.' तें ऐकून सुभद्रा झालेली नटी आगाऊपणानें म्हणाली, "त्याला अवश्य द्या तीर्थ – उगीच कुठंतरी गल्ल्याबोळांतून भटकत असतो !"

हा आगाऊपणा छोटा गंधर्वांना आवडला नाहीं. ते स्वभावानें साधे आणि सरळ आहेत. त्या नटीचें हें बोलणें ऐकून ते चिडले आणि म्हणाले, "ताई, तुलाच शोधायला मी तिकडं भटकत असतो."

या वाक्यानें प्रेक्षकांत हंशा उसळला आणि तो नटीचा चेहरा प्रेक्षणीय बनला.

–चा. य. गाडगीळ

अनुक्रमणिका

( पान १० वरून )

अशी आमची माती" असं इथिओपियन म्हणतात. दुतर्फा सळसळणारी शेतं. रस्ता वर खालीं वळसे घेत पुढें जातो. फर्लांगा फर्लांगाला समुद्रसपाटीशीं पांचशे-हजार फुटांचा व्यवहार होतो. आणि सुरुवातच साडेआठ हजार फुटांवर केलेली. हे इटालियन लोकांनी केलेले रस्ते. ही अधेंमधें अड-मडणारी फ्रँको–इथिओपियन रेल्वे. एक चिमटचासारखं वळण. दोहीं बाजूला दऱ्या. एक पांचशे फुटांचा वेदम चढ. आणि एक एकदम हजार फुटांचा उतार. नाझरेथः खोऱ्यांत वसलेलं एक गांव. इथून पुढें शोआ प्रांताची हद्द संपते आणि आवाश नदी ओलांडताच अरुस्सी प्रांत सुरू होतो.....

पुन्हां चढण. अरुस्सीचे मोकळे माळ, क्वचित् शेतं, सुपीक पडीक जमिनी, बोडके डोंगर, खिडारं, खडक, मघ्येंच पाठीवर पाण्याचा प्रचंड हंडा घेऊन वांकून जाणाऱ्या वायका. हातांत अनिश्चित भाला धरून घोड्यावरच थवकलेला कोणी गाल्ला तरुण. काठी सप्कारत गुरं पाठोपाठ उधळणारं गुराख्याचं पोर. बस वर वर चढत गेली. आतां उजवीकडे क्षितिजावर मंद जांभळट-मातकट डोंगर दिसले. उन्हांचीच धुकीं झालीशीं होती. समोरचा रस्ता मात्र रोख आणि सडेतोड उन्हस्पष्ट होता. मग झ्वाईचा झिळमिळता पाण्याचा पटः एक प्रचंड सरोवरः दुभंग दरींत उपजलेलं. डावीकडे चिलालू पर्वताचा प्राणायामी चढ. आणि हाच उतार — दगडांचा, पठारांचा, टेकाडांचा —हा घबघबा डोंगराचा थेट थांवतो ह्या सरो-वराशींच. चिलालूचा उतार, खालीं समोर झ्वाई सरोवर, मघ्यें असेल्ला वसलेलं आहे. उंची : आठ ते नऊ हजार फूट. युकॅलिप्टसची उंच उंच झाडं. (सम्राट् दुसऱ्या मेने-लिकच्या काळीं ही ऑस्ट्रेलियन रानटी युकॅलिप्टसची झाडं इथिओपियांत आणली गेली. आज ती सर्वत्र दिसतात.) साधी एकमजली मातीची घरं. भिंतींवर वॉलपेपर. खाली लाकडी तक्तपोशी.

बसभोंवतीं सगळा गांव जमा होतो. शाळकरी मुलं लगबगीनं येतात. "अस्तमारिनाच्चू"! (मास्तर आहेत वरं!) असं बड-बडत इंग्लिशमघ्यें विचारतात, "May I help you, sir ?" आम्ही शाळेच्या इमारतीकडे चालायला लागतों.
पाटीशीं पन्नास पोरं असतात.

"फरंजी! फरंजी"!

"मान्हो?" (कोण रे?")

"अड्डीस अस्तमारिनाच्चु" (नवे मास्तर आहेत).

"आरा!"(अरे!)

अचानक, आफ्रिकेंतल्या एका पठारावर, पन्नास नजरांच्या भाल्यांत कैद झालेला मी पिंजऱ्याकडे जाणाऱ्या वाघासारखा शाळेच्या कंपाऊंडांत शिरलों. माझ्या वाघिणीची स्थिति तर गाईसारखी झाली होती. ही सुरुवात.

## (३)

रात्रीच्या किर्र शांततेंत कुंपणाशीं एक तरस ओरडतो. तरस ओरडतो आणि मग पट्टी बदलून हिडीस हास्यासारखा आवाज करतो. लांब नाक्यावरलीं पन्नास कुत्रीं लवंगी फटा-क्यांच्या माळेसारखीं भुंकतात. मला जास्त जाग येते. वाहेर धुरकट युकॅलिप्टसमघून वारे वाहात जातायत. मी खिडकी उघडली तर बाहेरचा गारठा जाणवतो. शून्याच्या आसपासचं तपमान. दाट धुकं, पानांतून वाजणारा वारा. भुंकणीं. तरसाचं ओरडणं. पुन्हां खिडकी बंद करून मी पलंगाजवळ येतो. खोलींत मेणवत्ती जळतेय्.

"झोप येत नाहीं?"

"हूं"

"आई ग! केवढी थंडी!!"

## (४)

सुट्टीच्या दिवशीं एकदां माझे मित्र मल्य, ठाकूर, आणि मी, चिलालू पर्वतावर सहलीला गेलों. डोंगरावरच्या विरळ हवेंत धाप चटकन् लागते. तरी ठाकूर हिमाचल प्रदेशांतला, आणि मल्य स्वभावतः भटक्या. दर तीन चारशें फुटांना इथें वनस्पति बदलत जातात. हवा थंड आणि विरळ होत जाते. आम्ही स्ट्रॅबेरीज्ची झुडुपं बघितलीं आणि त्यांतच अडकलों. स्ट्रॅबेरीज् शोधतां शोधतां आम्ही डोंगरांतला एक उतरता दगडी काप पाहिला. त्यांतून पाणी घळाळत जात होतं. पहिल्यांदा पाणी दिसलं नाहीं. दुतर्फा झुकलेली गर्द झाडी दिसली आणि पाण्याचा वाहता आवाज कानांवर पडत होता. मग आम्ही त्या आवाजाच्या मागोव्याने गेलों. प्रचंड काळे पाषाण उतरून, दगडाच्या फटी, खोबणी, कंगोरे आधाराला घेऊन आम्ही खाली उतरलों. एक लहानसं दगडी अरण्य. त्यांतून पाणी वाहात होतं. समोर एक गुहा होती. तिच्यांत दगडी पारंव्या लोंबत होत्या. आणि आंत पाण्याची खळबळ ऐकूं येत होती. थंड, स्पंजसारखे पृष्ठभाग असलेल्या दगडांवरून उड्या मारत आम्ही गुहेकडे गेलो. ती गुहा नव्हतीच. तोंडाशी असलेलं विवर गुहेसारखंच वाटलं पण आंत एक नैसर्गिक चैत्य होता. वरून दगडी पारंव्या खालीं लोंबत होत्या. आणि एका उंच अंधाऱ्या विवरांतून फेसाळत पांढरं शुभ्र पाणी खालीं खळबळत येत होतं. एक छोटासा गुप्त घबघबा. आम्ही अंधारावर चेहरे रोखले, ते तुषारांनी ओले झाले. दगडावर लोण्याहून मऊ धार धरून दगड कापत, खोदत इथलं पाणी अनेक वर्षं वाहात होतं.

कौमार्य ही प्रत्येक अभिजात वस्तूची कायमची खूण. पहिल्यांदा मला वाटायचं कीं एखाद्याच संभोगांत कौमार्य नष्ट होत. मग, खूप उशिरां, कळलं कीं कौमार्य उत्पन्न करावं लागत. प्रत्येक प्रवेशानंतर सगळंच पुन्हां अक्षत होतं, आणि पुढला प्रवेश अधिकच दुर्दम्यपणें करावा लागतो. सगळं जग, होतं तसं, अनादि कालापासून अक्षत आहे. स्त्री पुरुष अक्षत आहेत. अस्तित्व अक्षत आहे. आणि प्रत्येक वस्तूंत कौमार्य उत्पन्न करून नष्ट करणारे प्रतिभाशाली लोक मात्र कोटचावधींत पांचसहाच निपजतात. म्हणून तर संवय होते, संस्कार उर-तात. लोकांच्या लग्नाच्या बायका निर्ढावलेल्या वेश्या वनतात. त्यांचं कौमार्य फक्त—शारीरीक—ढोबळ अर्थानें—लुटलं जातं. तेंहि एकदांच. कोणालाच सर्वत्र नवेपण उत्पन्न करतां येत नाहीं. समाधान झालं कीं माणूस काढता पाय घेतो; कोणीच कोसळत नाहीं.

निसर्गाचं हेंच. काव्य वगैरे घाणेरड्या लाळघोटचा "सौंदर्य-वादी" "रसिक" गोष्टींमुळें आमच्या डोळ्यांवर ढापणं आली. आम्ही लखनवी झब्बे घालून, मनगटाला गजरे बांधून, वाजीकरणाची औषधं घेत निसर्गाच्या माड्या चढलों. हा

अनुक्रमणिका







सुसंस्कृत पांढ व्यवहार. ह्यांतून येतात फक्त भावनांचे रंगी-बेरंगी बुडबुडे.

(५)

स्तब्धता, आफ्रिकन स्तब्धता. उंच पठारावरला अबाधित एकांत. सतत स्फुरणारं उजळ विरळ वातावरण. हवेंतून पसरणारी अनाहत उन्हं, ह्या पठारावर उभं राहून, सुप्त आणि जर्द प्रकाशांत अलगद संपणाऱ्या शांत संध्याकाळीं, मला एकदां वाटलं मोठ्यानं ओरडावं आणि ह्या अनादि सम्यतेचा कायमचा भंग करावा. उतरत्या उन्हांत अचानक माझ्या अंगावर निसर्गाचा माज चढला. माझं प्रत्येक रंध्र उघडलं. शिंगानें माती उकरणाऱ्या बैलाप्रमाणें मी ह्या शांततेचा रोख घेतला; माझ्या नाकपुड्या जळूं लागल्या. ओस-रत्या उन्हांत सोनेरी वाटणारीं कुरणं भराभर जांभळी होत गेली. मी संधान बांधून बेवारशी बनलो. माझे डोळे मोकळे झाले; माझे कान मोकळे झाले; माझा स्पर्श अपरंपार झाला. माझ्या डाव्या हाताला विषुववृत्त होतं आणि समोर झ्वाईच्या पाण्यांत भराभरा पालटणारं आकाश. तारे अक्षरशः लखलखले. आकाश कठिण, निळं. ह्या सर्वांवर एका पाशवी आरोळीची टिवांत लोपून जाणारी रेष. तेव्हां कदाचित् मी सगळे कपडे टराटर फाडून टाकले असते आणि त्या अविरत उतारावरून थेट झ्वाईच्या—चांदण्यांत फसव्या दिसणाऱ्या—अफाट मंद पाण्याकडे धांवत गेलो असतों.

(६)

अशा वेळीं अचानक मन पलटा खातं आणि गोत खाऊन थेट मुंबईच्या रस्त्यांवर जातं. शहरी रात्र. डांबरी आणि काँक्रीटचे रस्ते. सिमेंट आणि पोलादाचं अरण्य. कुणाच्याच नसलेल्या सैराट मोटारी. शहराचा सैराट सन्नाटा. हेडलाईटस्‌चे झोत. हवेवर हासडलेल्या शिव्या. रांडेचे तकाकणारे पारोसे डोळे. भोसकलेला सुरा. भूक. वाकड्यातिकड्या बेडसर गल्ल्या, तिरसट फुटपाथ. लांब रेडिओवर घोगरं गाणं. ठार उघडी रात्र. शहराचा सैराट सन्नाटा. निरभ्र जहन्नम. आणि हवेला पडणारी जन्नतच्या हकीकतीची लाख भोकं. खाड्या, पूल, खाडीवरून येणारा कुजका वारा. अचानक अंगावर भुंक-णाऱ्या जाहिराती. ओ राजकपूर! ओ मुंबई! जख्मे बेनाम. बेहोष ठार हवेंत गतिमान् मी. विझणाऱ्या माड्या, विस्तवा-वर फिरणारी मांसल सळई. आणि रेल्वेचं यार्ड, आत्महत्येचे लाल-हिरवे सिग्नेल. थेट उजेडांत आलेले थंड चकाकते समां-तर पोलादी रूळ. तारांचा झोळ. तरं मी नारळीच्या झाडां-खालीं झोंपडी झोपडींतून लोटलेला गल्लीबाहेर आणि रस्त्यांवर. काळोखांत गंजणारी समुद्राची गाज. मुंबई! मुंबई! मुंबई! तुटल्यासारखा मी खालीं येतो आणि पुन्हां शहराच्या रस्त्यांवर पडतों . . .

(७)

दिवस वाढला कीं मी ह्या अफाट आफ्रिकन शांततेंत संचारलों जायचों. रात्रीं, किंवा क्वचित् बारमध्यें पीत असतांना मात्र अचानक शहरांत परत जावंसं वाटायचं. माणसं, माणसं, गर्दी, गर्दी, गर्दी, हवी व्हायची.

गावांत एकूण सहा हिंदुस्थानी मास्तर होते. दोघे मल्याळी, दोघे महाराष्ट्रीयन (यांतला एक मी), एक राजपूत आणि एक मंगलोरी गौड सारस्वत ब्राह्मण! ह्यांतले इतर बारमध्यें कधींच जात नसत. पब्लिकमध्यें बसून बिअरसुद्धां पिणें त्यांना जड वाटे. घराची दारें बंद करून ते ब्रीज खेळतां खेळतां व्हिस्की पीत. ठाकूर, मल्य आणि मी मिळून ही सांस्कृतिक परंपरा मोडली. इतकंच नव्हे तर आम्ही इथिओपियन लोकांत मिसळूं लागलों. आमचे सभ्य आणि सनातनी मल्याळी मित्र ह्याची दबल्या आवाजांत चर्चा करूं लागले. इथि-ओपियांत भारतीय शिक्षक अनेक आहेत पण त्यांत बहुसंख्य मल्याळी सिरीयन ख्रिश्चन लोकांची. आणि ह्या लोकांत जगणं एकूण बरंच कटकटीचं असतं कारण त्यांना सगळेच लोक परके आणि संशयास्पद आणि छुपे शत्रू वाटतात.

—तर मल्य, ठाकूर आणि मी. सहा—सहा तास बिअर पीत असेल्ला हॉटेलच्या बारमध्यें पीत बसलेले. एक फोपशी बेट्रेस बिअरच्या बाटल्यावर बाटल्या उघडून ग्लास तिरके धरून आत बिअर ओतत असायची. ठाकूरला दारू आणि बायका ह्यांखेरीज दुसरा विषय ठाऊक नव्हता. मल्य "न्यू स्टेट्समन्"चे अंक वाचत बसे आणि मधूनच संस्कृति आणि राजकारणासारखे विषय पिसले जात. रात्रीं बारमध्यें गेलों तर देशी कोन्याक् किंवा स्टॉकची इटालियन ब्रँडी किंवा स्कॉच व्हिस्की पीत आम्ही बसत असूं. चार पांच पेगच्या वर दारू पिऊन झाली कीं आम्ही अचानक खुल्ले होऊन इतरांना बोलवायचों. हळूं हळूं आमच्या टेबलाजवळ इथि-ओपियन मित्रांचा गराडा पडूं लागला. मी भराभर अम्हारिक शिकत गेलों. जी पांच पन्नास वाक्यं येत ती नैसर्गिक सफाईनं बोलतां यायला लागली. आणि दारू पितांना भाषा कधींच अडत नसते हें तर खरंच

इथिओपियन इंपिरिअल बॉडीगार्डचा जनरल मंगीस्तू नवाई ह्यानें सम्राट हायले सेलासी परदेशांत गेला असतांना राज्य-क्रांतीचा ऐलान दिला. तोंवर राजा म्हणजे गृहित धरलेला सिद्धांत होता. लोक गोंधळून गेले. राजा परतला. बंड मोडलं. सैन्यांतले लोक बॉडीगार्डपासून फुटले. दोहोंत आठवडाभर लढाई झाली. बंड मोडलं. आणि आदिसअबाच्या रस्त्यांत मंगीस्तू नवाई फासावर चढला. आम्हीं तेव्हां इथिओपियांत नुकतेच आलों होतों.

मंगीस्तू फांशी गेल्यावर हळू हळूं लोकांना काय खुपतंय् हें कळून आलं. अफाट नैसर्गिक सुबत्ता असलेल्या ह्या देशांत दारिद्र्य आणि मागासलेपण जियें तियें दिसत. दहा बारा "रास" (सरंजामदार) सबंध देशाचे मालक आहेत. राजाची सत्ता प्रत्येक गोष्टीवर चालते. भडक ऐष न करणारा हायले सेल्लासी एक प्रतापी पण अत्यंत गुंतागुंतीचं व्यक्ति-मत्व असलेला हुकूमशहा आहे. इथिओपियांतली हेरांची जाळीं, तरुण, बुद्धिमान आणि बंडखोर लोकांची हद्दपारी किंवा याहून मोठ्या सजा, दबल्या आवाजांत चालणाऱ्या चर्चा, दारूबाज आणि रंडीबाज निराश तरुण पिढी, प्रचंड प्रमाणावर चालणारा वेश्याव्यवसाय, सर्वत्र बोकाळणारे गुप्तरोग, सर-कारी खात्यांतील लांचलुचपत, अम्हारा वंशाचं देशभरच वर्चस्व, मागासलेल्या गाल्ला आणि इतर वंशावर होणारे जुलूम—ह्या गोष्टी बाहेरच्या जगाला ठाऊक नव्हत्या. बंडाच्या गर्भपातानें त्या उघड्या पडल्या. देशांतले लोक ज्याचा विचारसुद्धां करायला भीत होते, तें घडून गेलं. पण एक गोष्ट नक्की ठरली. हायले सेल्लासी हा इथिओपियाचा शेवटचा पूर्ण सत्ताधीश सम्राट ठरणार. यापुढ "गिरमावी नगुसनगस्त झा इथ्योपिया" ही पदवी कोणालाच मिळणार नाहीं. "जुडाचा सिंह, सॉलोमनचा वंशज, महाप्रतापी, इथि-ओपियाचा राजाधिराज" हा शेवटचाच.

(क्रमशः)







# सन्मान पुष्पें

## अखंड उद्योग, प्रखर सत्यनिष्ठा

**प्रा.** न. र. फाटक यांच्या वयाला बहात्तर वर्षे पुरी झाली व त्यांनी त्र्याहत्तराव्या वर्षांत पदार्पण केले म्हणून त्यांचा मराठी ग्रंथ संग्रहालय व साहित्य संघ या संस्थांतर्फे दि. १५ एप्रिल या दिनी संघ मंदिरात जाहीर सत्कार करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार स्थानापन्न झाले होते. हा सोहळा अविस्मरणीय असा झाला. गुरुवर्य प्रा. न. र. फाटक यांचे बहुसंख्य विद्यार्थी व चहाते या प्रसंगीं तब्बल तीन तास संघ मंदिरांतील हा सत्कारोत्सव तन्मयतेनें पहाण्यांत रंगून गेले होते. वास्तविक प्रा. न. र. फाटक यांचा सत्कार यापूर्वीच निदान सत्तराव्या वर्षी तरी व्हायला हवा होता, असे कुणालाहि सहजच वाटणे शक्य आहे. तथापि प्रा. न. र. फाटक यानी निदान आपल्या बहात्तराव्या वर्षान्ती आपला सत्कार घडूं देण्याला संमती दिली. याबद्दल सर्वांनी प्रा. फाटक यांचे ऋणी राहिले पाहिजे. सत्कार समारंभाचा प्रा. फाटक यांना मनापासून कंटाळा आहे. यावेळींसुद्धा त्यांच्या चाहत्यांना ते आपला अमृतोत्सव होईपर्यंत थांबण्याचा सबूरीचा सल्ला देत होते. परंतु त्यांच्याच भाषेत सांगायचे म्हणजे त्यांच्या चाहत्यांना कदाचित स्वतःचा व प्रा. फाटकांचा विश्वास वाटेना. म्हणून मग त्यांनीं या समारंभाला मान्यता दिली.

प्रा. फाटक हे आज त्र्याहत्तराव्या वर्षीहि अविरत कार्यरत राहिले आहेत. ते आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत व्यवसायाने व व्यासंगाने मराठी या विषयाचे प्राध्यापक होते. परंतु तत्पूर्वी त्यांनी पत्रकार म्हणून कार्य केलें होते. प्रा. फाटक अलाहाबाद, लाहोर इकडील आपला ऐन तारुण्यांतील संचार आटोपून १९१८ साली मुंबईला आले व आजतागायत 'मुंबई' हीच त्यांची कर्मभूमी होऊन राहिली आहे. प्रथम त्यांनी 'इंदुप्रकाश' चे संपादन केले. म. म. पोतदारांच्या भाषेंत, "फाटक येण्यापूर्वी इंदुप्रकाश निघत होता. फाटक आल्यावर त्यात जीव आला." कै. काकासाहेब खाडिलकरांच्या हाताखाली करड्या व कठोर सत्यनिष्ठ शिस्तीखाली नंतर प्रा. फाटक यांनी वृत्तपत्रकार म्हणून कित्येक वर्षे अखंड लेखणी झिजविली. असें असलें तरी प्राध्यापक व पत्रकार असलेल्या फाटकांचा अस्सल पिंड इतिहासकाराचाच ठरला व तसाच तो आजवर टिकला. गप्पांचे व पानसुपारीचे व्यसन असूनही प्रा. फाटक यांनी मराठ्यांच्या इतिहासांत व संतसाहित्यांत उदंड संचार करून जे अखंड लेखन केले त्याला तोड नाही. त्यांनी अनेक वाद निर्माण केले याचें कारणच असे की वर्तमान काळांत राहूनही ते भूतकाळाशी व पर्यायाने इतिहासाशी अखंड संवाद करीत राहिले. त्यांनी ग्रंथप्रामाण्य वा व्यक्तीप्रामाण्य जसे केवळ आंधळेपणाने कधीच स्वीकारले नाही त्याचप्रमाणे तें आपल्या शिष्यांना व इतरांनाही वेंधळेपणाने स्वीकारू दिले नाही. आपल्या विद्यार्थ्यांनी विवेचनासाठी दुसऱ्यांचे आधार दिले की प्रा. फाटक त्याला विचारीत, 'तुका म्हणे, नामा म्हणे, हें खरें; पण तूं काय म्हणे ?" आपल्या विद्यार्थ्यांनी केवळ परीक्षार्थी व पोटार्थी बनूं नये असा त्यांचा सदैव कटाक्ष असे.

'दीपावली'चे व प्रा. न. र. फाटक यांचे संबंध नेहमीच जिव्हाळ्याचे राहिले आहेत. जुन्या सचिवालयांतील आपल्या मराठ्यांचा इतिहास लिहिण्याच्या कार्यांत गुंतलेले असूनही गेल्या वर्षी निघालेल्या दीपावलीच्या '**कै. हरिभाऊ आपटे**' खास अंकांत त्यानी कबूल केल्याप्रमाणे हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबरीवरील लेख लिहिला होता. एवढेच नव्हे तर महाराष्ट्र भाषाभूषण कै. ज. रा. आजगावकर यांचे आपल्या दप्तरांतील हरिभाऊ संबंधीचे खास लेखन त्यांनी 'दीपावली'-साठी उपलब्ध करून दिले होते. असा हा पूर्वपरंपरेंतील प्रचंड कार्याची अविरत धुरा वाहणारा तत्त्वनिष्ठ सत्यशोधक शतायु होवो व त्यांच्या जीवनापासून स्फूर्ति घेऊन त्यांची कार्यपरंपरा पुढे चालविणारी एक नव्या दमाची मराठी विद्वानांची पिढी तयार झालेली पहाण्याचे भाग्य त्यांना लाभो अशीच 'दीपावली' या शुभप्रसंगी त्यांच्यासाठी मनोमन प्रार्थना करीत आहे.

## 'रुद्रवीणा' झंकारली

**महाराष्ट्राचे** एक अग्रेसर कवि. **वा. रा. कान्त** यांना मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आले. कवि कांत यांच्या कवितेची' 'रुद्रवीणा' कितीतरी वर्षांपूर्वी झंकारली. तिचें स्वागत झालें. कौतुक झालें. पण निझामशाहीच्या प्रतिगामी राजवटींत ऐन उमेदीची, कर्तृत्वाचीं वर्षे गेल्यामुळें **वा. रा. कान्त** ह्यांचा मराठीच्या राजदरबारीं व्हावा तसा गौरव झाला नाहीं. एखाद्या संमेलनाचें अध्यक्षपद दिलें म्हणजेच तो होतो असेंहीं मी मानीत नाहीं. पण 'रुद्रवीणा' लिहिणारे कान्त त्यावेळीं जर पुण्या-मुंबईकडे राहात असते तर त्यांच्या कर्तृत्वाला व व्यक्तित्वाला एक आगळें तेज आलें असते असें मला वाटतें. कान्त आज मुंबईच्या आकाशवाणीवर Programme Executive म्हणून काम करीत असले तरी त्यांनीं आपल्या जीवनाची सुरुवात मात्र शेतकी खात्यांत कारकुनी पत्करूनच केली. त्यानंतर हैद्राबाद, औरंगाबादला ज्यावेळीं स्वातंत्र्यपूर्व कालांत नभोवाणी केंद्र मिळाले तेव्हां कान्तांची तेथें 'प्रोग्रॅम असिस्टंट' म्हणून नेमणूक झाली. वास्तविक त्या जागा पदवीधरांच्या! पण कान्त हे पदवीधर नसले तरी त्यांचें विशिष्ट वाङमयीन कर्तृत्व ध्यानीं घेऊन त्यांना स्वीकारण्यांत आलें. वास्तविक कान्तांची जागा Executive स्वरुपाची असूनही कान्तांनीं Production ची बाजूही

अनेकदां अत्यंत यशस्वीपणें हाताळली आहे. आकाशवाणी-साठीं त्यांनीं नाटकें, नभोनाटचें, संगीतिका व विविध प्रकारचा मजकूर लिहिला असून नभोवाणीसाठीं लेखन कसें असावें ह्याचा जणुं तो वस्तुपाठच ठरावा असा तो झालेला आहे. आकाश-वाणीच्या हैद्राबाद, औरंगाबाद, नागपूर ह्या केंद्रांवर कामें करून कान्त आज मुंबई नभोवाणीवर आले आहेत. कान्तांच्या प्रतिभेला एक व्यापक क्षेत्र मिळालें आहे. त्यांच्या कवितेला व्यापक रसिकतेची दाद मिळाली आहे. आज महाराष्ट्रांत नभो-वाणीवर व बाहेर साजऱ्या होणाऱ्या कविसंमेलनांत कान्तांची कविता म्हटली जात आहे. कान्तांच्या पेक्षां कितीतरी धाकुटचा अशा कवींसमवेत कान्त काव्यवाचन करतात आणि तरीही ते 'जुने' ठरत नाहींत. कारण कान्तांची कविता ही नव्याजुन्यांचा अपूर्व संगम घडवून आणणारी कविता आहे. कान्तांनी केलेल्या पाश्चिमात्य कवितेच्या अमाप वाचनांत त्यांना त्यांच्या प्रश्नाचें उत्तर मिळेल. नवकवितेचें आद्य पीठ कान्तांनी पाहिलें आहे. त्या पीठाचे संदेश वाचले, पचविले आहेत. मूळ प्रकृति न गमावतां त्यांनीं नवें माध्यम यशस्वीपणें हाताळलें आहे. कान्तांना खंडकाव्याची अतिशय आवड आहे. त्यांचीं कांहीं खंडकाव्यें लवकरच प्रसिद्धीचा प्रकाश पाहतील. अजिंठचाच्या शिल्पवैभवा-संबंधीं एक महाकाव्य लिहिण्याचा कान्तांचा संकल्प आहे. त्यादृष्टीनें कांहीं 'प्रवास' ही त्यांच्या प्रतिभेनें केला आहे. लघुनिबंध, कांहीं परीक्षणें व साहित्य टीका त्यांनीं लिहिली आहे. गद्य लेखन संख्येनें अपुरें असले तरी आज ते त्या क्षेत्राकडे नुकतेच वळले आहेत. ही वाटचालही ते यशस्वीपणें पार पाडतील असें म्हणायला त्यांच्या 'प्रतिभे'चाच आधार आहे.

कान्त स्वत:बद्दल तटस्थ आहेत. ते मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाल्याबद्दल अभिनंदन करण्यासाठी कांहीं मंडळी त्यांच्याकडे गेली तेव्हां तीं बोलत असतांना कान्तांचा चेहरा एखाद्यानें पाहिला असता तर त्याची कल्पना अशी झाली असती कीं, हें जें चाललं आहे तें दुसऱ्याच कुणाबद्दल ! वृत्ति लीनतेची ! पु. ल. दे. ह्यांनीं त्यांचें अभिनंदन केलें तेव्हां ते त्यांना म्हणाले, **"तुमचे आशिर्वाद पाहिजेत"** वास्तविक कान्त हे वयानें मोठे आहेत. पण कलावंताचे मोठेपण ते वयानें मोजीत नाहींत. ती पट्टी अखेर कलेचीच आहे हें जाणवतें. काव्य ही निष्ठा मानून तिची साधना करणाऱ्या ह्या कवीला आज मराठवाडा साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद लाभलें आहे. त्यांच्या कवितेनें तो मान कधींच मिळविला आहे. आतां 'खुर्ची' लाभत आहे. ती ते सुशोभित करतील असा आम्हांला विश्वास वाटतो.

## गुणवत्ता व रसिकतेचा संगम

**नौकरी** म्हटली कीं कुणीं तरी रिटायर होणार कुणीं राजिनामा देऊन जाणार, कुणाला प्रमोशन मिळणार तर कुणीं रिव्हर्ट होणार ! नौकरीचें हें चक्र असेंच वर्षांनुवर्षें प्रत्येक ऑफिसमध्यें चालूं असते. त्याच्या आरेबरोबर माणसें फिरत असतात. वर खालीं होत असतात . पण हा चक्रनेमिक्रम चालूं असतांनाही कांहीं माणसें वर येतात आणि आपल्या कर्तृत्वानें आणखी वर वरच चढत जातात. मग त्यांच्या गुणांची किंमत साऱ्यांना कळते. आणि "वा: छान !" असे उ स्फूर्त उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडतात.

महाराष्ट्र राज्यशासनाचे भूतपूर्व प्रसिद्धी संचालक श्री. **विनोद राव** ह्यांना **'इंडियन एक्सप्रेस'** ह्या इंग्रजी दैनिकाचें संपादकत्व दिलें गेल्याची वार्ता मी प्रथम ऐकली तेव्हां असाच उत्स्फूर्त उद्गार माझ्या तोंडून बाहेर पडला. विनोदराव ह्यांचें कार्यकर्तृत्व स्वयंभू आहे. इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व, गाढा व्यासंग, कल्पक, निर्माणक प्रज्ञा आणि पक्व व्यक्तित्व ह्यामुळें विनोद राव ही व्यक्ति केवळ शासकीयच नव्हे तर पत्रसृष्टींतही सुपरिचित होती. त्यांचा पिंड पत्रकाराचाच होता आणि आतां ते 'सुस्थळीं' जाऊन पडले आहेत. त्यांच्या कुशल संपादनानें **"इंडियन एक्सप्रेस"** अधिक कीर्तिवंत होईल असा मला विश्वास वाटतो.

नवे प्रसिद्धी व पर्यटन संचालक म्हणून **श्री. य. ह. पिटके** यांची नेमणूक झाली आणि प्रसिद्धी संचालन आतां योग्य व समर्थ हातीं सोंपविलें गेलें आहे ह्याची खात्री पटली. श्री. पिटके हेही विनोद राव ह्यांच्याचप्रमाणें हाडाचे पत्रकार आहेत. वाईसाताऱ्याकडील मायणी गांवचे मूळचे हे पिटके घराणें पुढें वऱ्हाडांतील अकोला ह्या गांवीं स्थायिक झाले. श्री. पिटके ह्यांचे बालपण, शिक्षण अकोला येथेंच झालें. लौकिकदृष्टचा एम्.ए. ही पदवी त्यांनीं संपादन केली. त्याकाळांत मॅट्रिकलाही महत्व होतें. मग एम्. ए. ही सर्वोच्च पदवी संपादन केलेल्या माणसापाठीं मानसन्मान व पैसा चालत आला असता. परंतु तो काळ केवळ वैयक्तिक मानसन्मान, पैसा यापाठीं लागण्याचा नव्हता. श्री. य. ह. पिटके हे त्या काळांतली सर्व प्रलोभनें बाजूस सारून 'मिशन' म्हणून वृत्तपत्रांत काम करूं लगले. आजची पत्र-व्यवसायाची स्थिति निर्बंधानुकूलतेमुळें पुष्कळशी बरी आहे. त्याकाळीं तो एक "ध्येयवाद" होता. ती 'सेवा' होती. तो एक 'यज्ञ' होता. एम्. ए. झालेला हा ध्येयवादी माणूस त्या वाटेनें गेला. "मातृभूमी" नामक जिल्हापत्र कॉंग्रेसच्या वतीनें निघत असे. त्याचें संपादन त्यांनीं केलें. **'मातृभूमी'** व्यतिरिक्त **'नागपूर टाइम्स'**, **'हितवाद'** यासारख्या सुप्रसिद्ध वृत्तपत्रांत त्यांनीं 'संपादनाची महत्वाची कामगिरी पार पाडली. **'हितवाद'**चे ते ४–५ वर्षें संपादक होते. वृत्तपत्र व्यवसायाचा त्यांचा व्यासंग ध्यानीं घेऊन १९४८ सालीं त्यांना राज्यसशासनाने प्रसिद्धि खात्यांत काम करण्यासाठीं पाचारण केलें व १९४८ पासून ते शासकीय नौकरींत आहेत. १९५६ साली त्यांची मुंबईला बदली झाली. १९५९ नंतर ते उपप्रसिद्धी संचालक म्हणून काम करूं लागले. सरकारी प्रकाशनापाठीं पिटक्यांची कल्पक व चोखंदळ वृत्ति होती हें त्यांच्या कारकीर्दीतली प्रकाशनें पाहून ध्यानीं येते. अर्थात 'ह्यांत' राव साहेबांचा सिंहाचा वांटा आहे हे त्यांनीं काढलेले उद्गार त्यांच्या ठिकाणच्या शालीनतेची कल्पना देण्यास समर्थ आहेत. वाचनाचे एकमेव पण जबर वेड त्यांना आहे. छंद तोच ! त्यांतल्या त्यांत 'रामदास' हा त्यांचा अतिशय आवडता विषय आहे. **'रामदासांचं कांहींहो असलं तरी मी तें आधीं वाचीन"** असं ते म्हणतात. अतिशय मनमोकळा व शालीन स्वभाव, प्रसन्न हास्य, वऱ्हाडी आदरातिथ्य, स्वत:संबंधी कमी बोलण्याची प्रवृत्ति हीं त्यांची आणखी कांहीं वैशिष्ट्यें ! येवढया मोठ्या जागीं बसू-नही त्यांचा स्वभाव निगर्वी, निरहंकारी आहे. श्री. **य. ह. पिटके** इतक्या मोठ्या गुणांचे पाथेय घेऊन आतां नव्या प्रवासाला निघाले आहेत. ते त्यांना यशाचा मार्ग दाखवील असा मला विश्वास वाटतो. गुणवत्ता आणि रसिकता जेथे हातांत हात घालून नांदतात तेथें कांहीं नवें, शिवस्वरूपाचें घडणें अपरिहार्य असते असें मी मानतो. पिटक्यांची कारकीर्द "शिवकर" ठरो ही शुभेच्छा !!

## मानकऱ्यांनो, तुम्हांस मुजरा

**पारितोषिक** मिळणें वा मिळविणें ही गोष्टच मोठ्या भाग्याची आहे. त्याला पुण्य गांठीला असावें लागते. प्रज्ञा, प्रतिभा आणि साधना ह्यांच्या अपूर्व संगमांतून हे यश येत असते. म्हणूनच ज्यांच्या ज्यांच्या साधनेला यशाची ही राजमुद्रा लाभली आहे त्या साऱ्यांचें सर्वप्रथम अभिनंदन करतो. हें अभिनंदन करीत असतांना त्यांतल्या विज्ञानादि

सर्वशाखांतील मानकऱ्यांचे अभिनंदन मी गृहित धरलें आहे. कारण वाङ्मय समृद्ध होणें ह्याचा अर्थ त्याच्या सर्व शाखांना बहर येणें होय असें आम्ही मानतो. कथा जाहली उदंड आणि साहित्यचर्चा जाहलीच नाहीं तर तें शुभलक्षण कसें म्हणतां येईल ? आजचें जग अधिकाधिक विज्ञाननिष्ठ होत असतां आपला शास्त्रज्ञ जर प्रयोगशाळेचे बाहेर आलाच नाहीं तर तें कसें उचित ठरेल ? येणाऱ्या पिढीला कांहीं-तरी नवें हवेंसें वाटणें साहजिकच. तेंही दिलें गेलें पाहिजे. म्हणून राज्यशासनानें व्यापक बैठकीवर जें पारितोषिक वितरण सुरू केलें आहे त्यावद्दल शासनाचें अभिनंदन !

शासकीय 'ईश्वरा'तें वंदन करून मी आतां मानकऱ्यांकडे वळतो. खास पारितोषिक देऊन गौरविलेल्या **जयवंत दळवींचे** आम्ही प्रथम अभिनंदन करायला हवें. दळवींनीं ह्या वर्षांत अनेक विक्रम केले आहेत. '**चक्र**' ह्या त्यांच्या पहिल्याच कादंबरीनें दुहेरी पारितोषिक मिळविलें. '**सारे प्रवासी घडीचे**' ह्या पुस्तकाला आतां १५०० रुपयांचें खास पारितोषिक मिळालें आहे. ह्यांत '**दीपावली**'ला साभिमान आनंद वाटतो. कारण 'आपू'ची ही कथा '**दीपवली**'त प्रसिद्ध झाली. ती कादंवरी नाहीं. तें प्रवासवर्णन नाहीं. तें आत्मचरित्र (रूढार्थानें) नाहीं. तें पुस्तक बंदिस्त करतां न येण्याइतकें स्वतंत्र व चांगलें असल्यानें त्याला खास बक्षीस द्यावें लागलें. तें पुस्तक वाचत असतांना मला शरदबाबूंच्या '**गांवगंगा**' ह्या कादंवरीची अपरिहार्यपणें आठवण झाली. त्या गावांतल्या विविध व्यक्तिरेखा हाच मुळीं कादंवरीचा विषय ! 'सारे प्रवासी'मध्यें 'आपू'च्या आयुष्याची जडणघडण कशा माणसांत व वातावरणांत हंत गेली याचें मोठें खुमासदार वर्णन श्री. दळवींनीं केलें आहे. दीपावलीच्या लेखक मित्रांपैकीं कवि कुसुमाग्रज 'इंदिरा संत' ग. दि. माडगूळकर हीं नांवें त्या मानकऱ्यांच्या यादींत आहेत. हिमरेषा व रंगबावरी हे दोन कवितासंग्रह अनुक्रमे कुसुमाग्रज व इंदिरा संत ह्यांचे होत. दोघांची काव्यक्षेत्रांतली कामगिरी मोलाची व स्वतंत्रपणें नमूद करतां येण्याइतपत महत्त्वपूर्ण ! ! यंदा त्यांची काव्यसेवा 'राजमान्य' झाली. ती 'लोकमान्य' होतीच. त्यांचें अभिनंदन ! कादंबरीच्या पारितोषिकाचे मानकरी श्री. मनोहर शहाणे (धाकटे आक.श) व भाऊ पाध्ये (वैतागवाडी). मनोहर शहाणे ह्यांच्या पहिल्याच कादं-बरीनें ही झेप घेतली आहे हें निःसंशय कौतुकास्पद होय ! भाऊ पाध्ये हा एक आगळाचाच ढंगाचा लेखक आहे. थोडेंच पण पृथगात्म लेखन त्यानें केलें आहे. सूक्ष्म अवलोकन व स्पष्टपणें (Bluntly) तें अवलोकन मांडणें हे त्याचे गुणविशेष ! गेल्या पिढींत ज्यांनीं विपुल विनोदी लेखन केलें. कादंबऱ्याही लिहिल्या त्या मो. वा. जोशी ह्यांच्या आत्मचरित्राला यंदा बक्षीस मिळालें आहे. वाह्यतः अबोल वाटणाऱ्या पण गप्पा रंगल्या कीं इष्ट मित्रांना हंसवून बेजार करणाऱ्या रसिक वृत्तीच्या शांत व संयत जीवन जगणाऱ्या ह्या पथिकाला आयुष्याच्या उत्तरार्धांत कां होइना हा गौरव प्राप्त झाला ह्यावद्दल मला आनंद वाटतो. 'औदुंबर'कार पानवलकर खानोलकर (सनई) दि. वा. मोकाशी (पालखी) नरहर कुरुंदकर (रूपवेध) ना. ग. जोशी (मराठी छंदोरचनेचा विकास) पा. चि. पाटील (माझ्या आठवणी) वगैरे सर्व मानकऱ्यांचें आम्ही अभिनंदन करतो.

नाटकाचीं पारितोषिकें वेगळीं दिलीं गेलीं आहेत. त्यांत दीपावलीचे एक कुटुंबीय रॉय किणीकर (येग येग विठावाई) ह्यांना पहिलें बक्षीस मिळालें आहे. असामान्य प्रतिभेचा एक अवलिया माणूस असं किणीकरांचें वर्णन करतां येईल. किणीकर यांचे आम्हीं अभि-नंदन करतो तसेंच पुरुषोत्तम दारव्हेकर (वऱ्हाडी मानसं) ह्यांचेहि!

मराठी साहित्याच्या ह्या साऱ्याच मानकऱ्यांना दीपावली मानाचा मुजरा करीत आहे.

—**आदित्य**








# "रायगडा" ची मुलुखगिरी



**रायगडचे** राजे कोंडीत सांपडले आणि जयसिंहाबरोवर तह मान्य करावा लागला. औरंगजेबाच्या दरबारीं जावें लागलें पण तें काळाचें आव्हान त्यांनीं स्वीकारले. राजे उत्तरेस गेले. आणि मराठी बुद्धीचें पाणी दाखवून पेटाऱ्यांतून पसार झाले. पण हा झाला इतिहास! वर्तमानांत काय?

इतिहासाची पुनरावृत्ति होते म्हणतात ती अशी! आजही मराठी प्रज्ञा आणि मराठी कला तोच इतिहास आपल्या कर्तृत्वानें घडवीत आहे. लिहीत आहे. तसें नसतें तर गोवा हिंदु असोसिएशनच्या **'रायगडला जेव्हां जाग येते'** ह्या प्रा. वसंत कानेटकर लिखित नाटकानें दिल्ली जिंकली नसती. **"भाऊबंदकी"** हें दिल्ली जिंकणारें पहिलें ऐतिहासिक नाटक जुन्या पठडीतलें. बऱ्याचशा मागच्या पिढींतल्या गाजलेल्या नटांनीं सादर केलेलें! पण 'रायगडा'ची गोष्ट तशी नाहीं. मास्टर दत्ताराम व सौ. ललिता जोगळेकर जर सोडल्या तर नव्या मंडळींनीच स्वकर्तृत्वावर उभें केलेलें तें नाटक! कानेटकर यांचें पहिलेंच विक्रमी ऐतिहासिक नाटक! महाराष्ट्रांत, गोव्यांत, सर्वत्र नाटकाला अमाप लोकप्रियता लाभली. पैसाही मिळाला. त्यामुळें त्याला दिल्ली (जनता) दरबारचें आमंत्रण आले हें स्वाभाविकच घडलें. ही मंडळी दिल्लीला गेलीं ती त्यादिवशीं प्रवासाचा शीण घालवून दुसरें दिवशीं नाटक करायच्या तयारीनें! पण स्त्री हट्ट, वाल हट्टाप्रमाणें रसिकांचा हट्ट मोडणें हें कुठल्याही कलावंताला (हाडाच्या) शक्य होत नाहीं. हीं मंडळीं 'दिल्ली आली' म्हणून सुटकेचा व आनंदाचा निश्वास टाकतात न टाकतात तोंच दिल्लीकरांनीं वॉरंट वजावलें. आज रात्रीं नाटकाचा (अनधिकृत) प्रयोग व्हायलाच पाहिजे. ह्या 'च'चें सामर्थ्य खूप वाढलें असल्यानें कलावंताना दिल्लीपतीची आज्ञा शिरसावंद्य मानावी लागली. त्या रात्रीं प्रयोग झाला. कित्येकांना तिकिटें मिळालीं नाहींत. दुसऱ्या दिवशीं पूर्वीचा जाहीर झालेला प्रयोग झाला. कांहीं निराश आत्मे घरीं परतले. 'वन्स मोअर'ची टाळी—नव्हे टाळ्या पडल्या. पण इलाज नव्हता. ना. यशवंतराव चव्हाण, सर न्यायाधीश गजेंद्रगडकर ही मंडळी आवर्जून हजर होती. वेळ नसणारांनीं वेळ काढला. असणारांनीं तो सत्कारणीं लागल्याचें समाधान व्यक्त केले. कांहीं चांगली चांगली मंडळी तिकिटें न मिळाल्यानें चिडून निघून गेलीं. 'रायगड'नें अनेक 'वन्समोअर' नोंदवून ठेवले. पूर्वीप्रमाणें पहांटेपर्यंत नाटकें चालवतां येत नसल्याने जशी 'वन्समोअर'ची जागा 'नो मोअर'नें घेतली. तद्वतच 'रायगडला' नो मोअर प्लीज् म्हणून दिल्लीकरांचा रसिक आग्रह मोडावा लागला. 'फिर मिलेंगे' म्हणून त्यांनीं निरोप घेतला. 'रायगड'चे दिल्लीचे प्रयोग म्हणजे कलावंताची एक सत्वपरीक्षा होती. शेंकडो प्रयोग केल्यानंतरही दिल्लीचा **'पहिलाच'** प्रयोग ही जाणीव कलावंताच्या उरांत धडधडत होती. पण शब्द आणि कलाही मोठी! त्या दोघांचा अपूर्व संगम घडला म्हणून कलाब्रह्म उभें ठाकले. दिल्लीकर धाले. त्यांनीं पुन्हां पुन्हां जयजयकार केला रायगडाचा! त्या शंभूराजांच्या मानसिक संघर्षाचा आणि शिवरायांच्या वेदनेचा! दिल्ली जिंकली. फड मारला आणि गोवा हिंदु असोसिएशनचे कलावंत मुंबईला परत आले. परतल्यावर त्यांनीं आणखी दोन विक्रम साजरे केले. एक 'रायगड'चा २०० वा प्रयोग व दुसऱ्या संगीत प्रधान नाटकाचा (मत्स्यगंधा) ५० वा प्रयोग! दोन्हीं नाटकें कानेटकरांचीच! एक ऐतिहासिक तर एक पौराणिक! एक गद्य तर दुसरें संगीत! दोघांचाही दिग्दर्शक एकच—मास्टर दत्ताराम! कानेटकरांच्या प्रतिभेची ही दोन निःश्वसितें गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाकारांनीं झेलली आणि त्याचें सोनें करून दाखविले. इतक्या अल्पावधींत एखाद्या ऐतिहासिक, गद्य नाटकाचे २०० प्रयोग एखादा हौशी नटसंच (अपवाद वरचे दोन) सादर करूं शकतो हाच मुळीं मराठी रंगभूमीच्या इतिहासांतील मोठा विक्रम आहे. ह्या नाटकाची मोहिनी येवढी कां पडावी असें अनेकांना कोडें वाटतें. मागें एका मासिकानें एक मोठा परिसंवादही सादर केला होता. त्यांत ह्या नाटकाच्या मुळावरच कांहीं टीकाकारांनी घाव घातले होते. पण कां कुणास ठाऊक जें टीकाकार नाकारतात तेंच पुष्कळदां रसिक प्रेक्षक उचलून धरतात. **दुरितांचे तिमिर जावों, वाहतो ही दुर्वांची, पंडितराज जगन्नाथ, रायगडला जेव्हां जाग येते** ही कांहीं उदाहरणें! आजचें सर्वांत यशस्वी नाटक असें जर मी त्या नाटकाचें वर्णन केले तर कुणाला खंत वाटूं नये. वस्तुस्थिति ही कांहीं तुमच्या आमच्या बरें वाईट वाटण्यावर अवलंबून नसते हेंच खरें (व बरेंही). ह्या दोन्हीं नाटकांबद्दल विस्तृत परीक्षणें ह्यापूर्वींच लिहिलीं आहेत. ह्या ठिकाणीं त्यांनीं जो नवा विक्रम केला आहे त्यांचें अभिनंदन करण्याचाच एकमेव हेतु मनांत आहे. **"नाटक कसें बसवितात"** हा वस्तुपाठ किती महागांत पडतो ह्याची नाटकवेड्या जगाला कल्पना आहे. अशा परिस्थितींत एक दोन किरकोळ अपवाद वगळतां (डॉ. घाणेकर, सुधा करमरकर) पहिल्या प्रयोगाची 'टीम' दोनशेंव्या प्रयोगाला कायम राखणें हे मोठें दिव्यच! तें दिव्य निर्मात्या संस्थेने करून दाखविलें ह्याबद्दल तिचे—गोवा हिंदु असोसिएशनचे मी अभिनंदन करतो. 'मत्स्यगंधे'ची प्रकृति वेगळी आहे. तें कांहींसे बुद्धीला धक्के देणारें नाटक आहे. म्हणूनच दोन्ही नाटकांच्या यशाची गति वेगवेगळी आहे. (ती तशी राहणे अपरिहार्यच) राय गडाचे 'अपील' सार्वकालिक स्वरूपाचं आहे. 'मत्स्यगंधे'चें अपील, मोठी मूल्यें समजूं व मानूं शकणाऱ्या मनांना आहे. ही दोन्ही नाटकें 'मोठी' आहेत आपल्या परीने!' फक्त 'जात' वेगळी आहे. प्रयोग होत राहणे निराळे व लावीत राहणें निराळें! होत राहण्याचा विक्रम ह्या नाटकांनीं केला आहे. मी सर्वच संबंधीतांचें व त्यांच्या प्रयत्नांचे अभिनंदन करतो.

—अभिनवगुप्त

चांदण्यांचें जग

# 'तुकारामा'चा नवा अवतार

"**पागनीस** म्हणजे तुकाराम. दुसरा तुकाराम आम्हीं कल्पनेंत आणायला सुद्धां तयार नाहीं. मग प्रत्यक्ष रुपेरी पडद्यावर पाहण्याची वातच नको." अशा शब्दांत अनेकांनी "**तुका झालासे कळस**" हा बोलपट प्रसिद्ध होण्यापूर्वी आपला अभिप्राय व्यक्त केला. पागनीस आणि दिघे अशी तुलनाच करूं नये असें कांहींचें मत आहे. पण जीवनांतल्या अन्य क्षेत्रांप्रमाणें कलेच्याही क्षेत्रांत कांहीं मानदंड उभे राहत असतात. ज्ञानेश्वर (शाहू मोडक) तुकाराम (पागनीस) रामशास्त्री (जागिरदार) शिवाजी (चंद्रकांत) संभाजी (मा. विठ्ठल) हे कांहीं मानदंड मानले गेले आहेत. येणारा नवा तुकाराम, ज्ञानेश्वर, शिवाजी ह्यांना ह्या तुलनेच्या दिव्यांतून जावेंच लागतें. तें अपरिहार्य आहे असें मला वाटतें. कुमार दिघे ह्या दिव्यांतून यशस्वीपणें बाहेर पडतात म्हणून सुरुवातीलाच त्यांचें व त्यांची निवड करणाऱ्या निर्मात्यांचें अभिनंदन करतों.

तुकारामाची जीवनकथा सुपरिचित आहे. तुकारामाच्या जीवनांत त्याच्या साधुत्वाचा आणि कवित्वाचा द्वेष करणारा मंबाजी आणि तुकाराम शूद्र असल्यानें त्याला कवित्व करण्याचा अधिकार नाही 'असे' त्याला बजावणारा व त्याचीं कवनें इंद्रायणींत बुडविण्याची आज्ञा देणारा रामेश्वरशास्त्री ह्यांच्या विरोधांतून अखेर त्याचे 'अभंग' अभंग राहतात, ह्या महत्वपूर्ण घटनेपर्यंतचा जीवनपट फार हृद्य तपशीलाची जोड देऊन सादर करण्यात आला आहे. तुकाराम हा संसारांत विरक्त वृत्तीनें वावरणारा संत होता. संतू तेल्यानें त्याचीं कवने लिहिलीं. आणि गांवोगांवीं कीर्तनांतून ती गेली. तुकारामाच्या जीवनांत कांहीं चमत्कारही घडले. पण ह्या चित्रपटांत मला सर्वांत हृद्य भाग वाटला तो तुकारामाच्या, आवलीच्या व मुलांच्या जीवनांतले जिव्हाळ्याचे प्रसंग! सहा महिन्यांनीं तुकाराम घरीं येतो. येतांना कांहीं कपडालत्ता घेऊन, खाऊ घेऊन येईल म्हणून अपेक्षा आवली करते. तो बुक्का, माळ घेऊन येतो. आवली संतापते. तुकारामाला मंबाजीची माणसें मारतात तेव्हां आवली जोडा घेऊन मंबाजीला मारण्यास जाते तो प्रसंग, तुकारामाचेंच रुप घेऊन विठ्ठल मंबाजीचें देणें फेडतो तो प्रसंग. रंभा तुकारामाला मोहवश करण्याचा प्रयत्न करते त्याप्रसंगी तिच्या वार्धक्याचीं रुपें दाखवून घडविलेला जीवनासंबंधीचा मूलभूत साक्षात्कार, शिवाजीवरील हल्लयाचा प्रसंग आणि अखेरचें सदेह वैकुंठागमन ह्या प्रसंगांचे चित्रण हृद्य आहे. पांडुरंगानें तुकारामाचें रुप घेऊन घर परत केलें हें ध्यानीं आल्यावर आवलीच्या मनांत उत्पन्न झालेला गोंधळ (गोड) कॅमेऱ्यानें चांगला टिपला आहे.



आवली ही व्यक्तिरेखा फार चांगली लिहिली आहे. ती केवळ कजाग, भांडखोर नव्हती. ती 'पत्नी' होती, 'आई' होती आणि 'माणूस' होती. ह्याचा तपशील प्रसंगा प्रसंगातून मिळतो. मला ही व्यक्तिरेखा चिंतनीय वाटते. सुलोचनाबाईनीं ती भूमिका समर्थपणें उभी केली आहे. त्यांचें दुःख, आनंद आणि अखेरचा आक्रोश हृदयाला भिडतो. "धनीऽऽऽ" ह्या एका शब्दांत त्यांनीं हृदयांतलें सारें दुःख जणुं ओतून टाकलें आहे. कमलाकर टाकळकर (मंबाजी) जीवनकला (रंभा) वसंत ठेंगडी (आवा जोशी) हंसराज कोरडे (संतू तेली) ह्यांच्याही भूमिका बऱ्या झाल्या आहेत. टाकळकरांची भमिका कांहीं टिकाणीं उगीच आक्रस्ताळी (Melo dramatic) झाली आहे.

चित्रपटाचें प्रमुख आकर्षण म्हणजे स्नेहल भाटकर यांचें संगीत हें होय. आरती, भूपाळी, गजर, अभंग, गवळण इत्यादि विविध काव्य प्रकार यांत आहेत. त्या काव्य प्रकारांना साजेशा रसानुकूल चाली भाटकरांनीं दिल्या आहेत. परंपरेतून वाढलेला संगीत दिग्दर्शक ह्याला मिळाला आहे हें ह्या चित्राचें मोठें वैशिष्ट्च! हनुमंताची आरती; सांवळे सुंदर, रुप मनोहर; आम्हीं जातो आमुच्या गांवा; शंख, चक्र गदा पद्म हीं गाणीं लोकप्रिय होतील. शेवटची ईस्टमन रंगातील तुकारामाची महायात्रा प्रेक्षणीय झाली आहे. चित्रपटांत दोष नाहींत असें नाहीं. मला स्वतःला लहान मुलांची कामें (व त्यांची निवडही) फारशी 'सुयोग्य' वाटली नाहीं. तुकारामाच्या मुलांचा फारसा उपयोग कां करून घेण्यांत आला नाहीं? तुकारामाच्या मनांत त्यांच्याविषयीं कांहीं प्रेम होते कीं नाहीं? तसें कांहीं सूचक प्रसंग येणें आवश्यक वाटतें. शिवाजी राजांना अटक करण्याचा प्रयत्न होतो तो प्रसंग मात्र 'कधीं संपेल' इतपत लांबला. पण ह्या उणिवांनीं चित्रपटाच्या परिणामांत फारशी उणीव उत्पन्न होत नाहीं. माडगुळकरांची पटकथा समाधान देते. 'तुकारामा'ला हात लावणें हें एक धाडस होतें. पण निर्माते ना. गो. दातार ह्यांनीं तें केलें. सदाशिवराव कवींनीं त्याना योग्य 'सल्ला' दिला व कुमार दिघे ह्यांनीं त्यांना योग्य ती साथ देऊन तुकोबाच्या कथेवर कळस चढविला म्हणून चित्रपट पूर्ण झाला "**तुका झालासे कळस.**" दिग्दर्शक राजा नेने यांनीं आपली कामगिरी बजावतांना "अन्याय होऊं दिला नाहीं" येवढीच त्यांची भलावण करतां येईल. कुमार दिघ्यांचा 'तुकाराम' पाहण्यासाठीं आणि स्नेहल भाटकरांचे गोड अभंग ऐकण्यासाठीं प्रत्येक मराठी प्रेक्षकानें हा चित्रपट पाहिलाच पाहिजे.

**—चित्रगुप्त**

## ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन

काळा समुद्र ● नाटककार खाडिलकर

### सांकेतिक चित्रण

**आशयाच्या** दृष्टीनें बदललेल्या मराठी कादंवरीत वासनेचें चित्रण निरनिराळ्या संदर्भात केलेले दिसून येते. वामन इंगळे यांच्या या पहिल्या कादंवरीत एका प्रतिष्ठित पण विकृत मनाचे चित्रण केलेले आढळून येते.

आत्मकथेचे रूप धारण करणाऱ्या या कादंवरीत अनिल मुझुमदार आपली झालेली कुचंवणा वाचकांपुढे ठेवतो. रेल्वेच्या डब्यांतील प्रसंगचित्रणानंतर फ्लॅशबॅक पद्धतीने कथानक निवेदन केले आहे. अनिल मुझुमदार नवेगांवहून मिर्झापूर येथे तात्यासाहेबांकडे (एक ख्यातनाम कवि व 'तुतारी' मासिकाचे संपादक) शिक्षणाच्या निमित्तानें राहण्यास येतो. तात्यासाहेबांच्या घरांतील संपन्न व आलिशान वातावरणांत अनिल रमतो. नैनूवद्दल (तात्यासाहेवांची मुलगी) त्याला मनापासून सहानुभूति वाटते. तिच्या पांगळेपणामुळें या सहानुभूतींत आणखीनच भर पडते. यावरोवरच सरितेची (डॉ. रणदिवे यांची मुलगी) जीवघेऊ खिलाडू वृत्ति अनिलला मोहित करते. शेवटीं मानसिक विकृतीने पछाडलेले तात्यासाहेव अनिलच्या भोळेपणाचा फायदा घेऊन एका वेगळ्याच शारिरीक सुखाची अपेक्षा करतात. तात्याच्या वर्तनामुळें त्याचे मनःस्वास्थ बिघडते व नैनू—सरिताच्या कोंडीत सांपडल्यामुळे अनिलच्या मनांतील संघर्ष तीव्र स्वरुप धारण करतो. अनिल नवेगांवला परत जातो. रजा संपल्यावर तो पुन्हां मिर्झापूरला येतो. नैनूचे लग्न तात्यासाहेबांनी माधव डोंगरेशी लावून दिल्याचे त्याला समजते. आत्मघाताचे विचार मनांत येत असतांना मिर्झापूर या शहराबाहेरील एका हॉटेलमधे वसून अनिल मुझुमदार आपली आत्मकहाणी लिहितो.

लेखकाच्या या पहिल्या वहिल्या कादंबरीत नवेपणामुळे येणारे काही दोष जाणवल्यावांचून राहात नाहींत. अपवादात्मक प्रसंग सोडल्यास निवेदनाचा कच्चेपणा आढळतो. कादंबरीच्या विकासाबरोबर व्यक्तिचित्रांचा विकास व्हावा अशी सामान्यतः अपेक्षा असते. व्यक्तिचित्रें स्वतंत्रपणे आकारूं शकत नाहींत. 'नैनू'चे व्यक्तिचित्र या वावतींत अपवाद म्हणून सांगावे लागेल. डॉ. रणदिवे व तात्यासाहेब तसेंच नैनू व सरिता हीं व्यक्तिचित्रे परस्पर विरोधांतून निर्माण झाली आहेत. नैनू व सरिता या दोन व्यक्तिचित्रांतील विरोध अपरिहार्य वाटला तरी तात्यासाहेव व डॉ. रणदिवे या दोन व्यक्तिचित्रे सांकेतिक ठोकळेवाज वाटतात. 'जगतराम' हे छोटेसे पण आकर्षक पात्र त्याच्या रेखाटनांतील सूचकता उल्लेखनीय आहे. जगतरायचे व्यक्तिचित्र शेवटपर्यंत रंगविण्यांत लेखकानें कुशलता दाखविली आहे. 'जगतराम' व 'अनिल' यांची कोंडी एकाच परिस्थितींतून जन्माला येते. दोघेहि तात्यासाहेवांच्या वासनेचे वळी पडतात.

**'काळा समुद्र'** चा मूळ विषय आकर्षक आहे यांत संशय नाही. वासनेचे नेहमी केले जाणारे जें चित्रण त्यापेक्षा हें चित्रण वेगळे आहे. मात्र मुळांतच वजनदार असणारा हा विपय हाताळतांना लेखक कमी पडतो आहे असें म्हणावेसे वाटते. 'अनू'ची अगतिकता व सरिता आणि अनू यांच्या संबंधातून अनिलच्या मनांतील संघर्ष इंगळयांनी यशस्वीपणे रंगविला आहे. मात्र तात्यासाहेवांच्या अनिलच्या संवधाचे 'संघर्षरूप' फिके वाटते.

तात्यासाहेबांच्या मानसिक विकृतीचे चित्रण त्याच्या व डॉ. रणदिवे यांच्यातील चर्चेअभावी जास्त यशस्वीपणे करतां आले नसते काय असा प्रश्न ही कादंवरी वाचतांना सारखा उभा राहतो. पाशवी वासनेच्या समर्थनासाठी तात्यासाहेवांनी केलेला मधुराभक्तीचा पुरस्कार व डॉ. रणदिवे यांचा उत्तरवजा लेख यामुळे कादंवरीच्या मूळ विषयाला जास्त सांकेतिकता आली आहे. तात्यासाहेवांची विकृति हा कादंवरीचा मूळ विषय. या चर्चेविना व समर्थनाविना जास्त आकर्षक व वास्तव वनविता आला असता. किंवहुना त्या विषयाच्या संवदर्भात निर्माण झालेली व्यक्तिचित्रे जास्त सखोल वनली असती. त्यांचे मानसशास्त्रीय स्वरुप एक वेगळी उंची प्राप्त करूं शकलें असते. याच दोषामुळें नवीन वाटणारा विषय तितक्या उंचीवरून हाताळला गेला नाही असें म्हटले पाहिजे.

**—वि. शं. चौघुले**

[ **काळा समुद्र**. ले. **वामन इंगळे** प्रकाशक—मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४. किंमत ३ रु. ]

## खाडिलकर आणि श्री. लेले

**'नाटककार** खाडिलकर' हें पुस्तक अनेक दृष्टींनीं कुतुहलजनक आणि महत्वाचें आहे. लेखक श्री. पु. रा. लेले हे खाडिलकरांचे स्नेही होते. त्यामुळें पुस्तक खाडिलकरांची थोरवी सिद्ध करण्याच्या प्रयत्नांत वैय्यक्तिक हेवेदावे, पूर्वग्रह यांनीं भरलेले आहे. भाषाही वाजवीपेक्षां अधिक ताठर आणि आग्रही आहे. पण त्यामुळेंच पुस्तकाला एक वेगळेंच आकर्षण प्राप्त झालें आहे.

पुस्तकाच्या प्रारंभीं लेखकानें स्वतःचें निवेदन 'सत्यमपि जयते' या नांवखालीं जोडलें आहे. त्यांतील कांहीं वाक्यें उद्धृत केलीं तरी पुस्तकाची भूमिका स्पष्ट होईल. "....नाटकांकडून खाडिलकरांकडे जाऊं नये, खाडिलकरांकडून नाटकांकडे जावें.....कालाला कलाटणी देणारांमध्यें खाडिलकरांची गणना करतां येते....या पुस्तकांत पुनरुक्ति आहे, ती जाणून बुजून अक्कल हुषारीनें केलेली आहे....लिहिण्याच्या केवळ हौसेसाठीं हें पुस्तक लिहिलेलें नाहीं. थोर पुरुषाचें ऋण फेडण्याचें भावनेनें हें लिहिलेलें आहे." यावरून सहज लक्षांत येईल कीं हें पुस्तक फार 'आवेश'पूर्ण आहे. इथें स्वमताचा आग्रह आहे तो इतका की कधीं त्याचें दुराग्रहांत रुपांतर होतें. पण या आग्रहीपणाचें कारण सहजच कळून येतें. लेखकाला खाडिलकरांच्या वद्दल भक्ति आहे. आणि त्याशिवाय त्यानें तो काळ पाहिलेला आहे. एकूण मराठी नाटक व त्यामागची राष्ट्रीय पार्श्वभूमि यांची त्याला तीव्र जाणीव आहे. त्यामुळें आत्ताच्या पिढीला हें सारें सांगितलेंच पाहिजे, दांभिकांच्या दंभाचा स्फोट केला पाहिजे, या पोटतिडीकीनें हें पुस्तक लिहिलें आहे.

या पुस्तकाचा सर्वांत मोठा गुण म्हणजे त्यांतील खाडिलकरांच्या काळाचें प्रत्ययकारी चित्रण, राजकीय, सामाजिक, साहित्यिक अशा विविध क्षेत्रांतील घटना, सबंध, भारताचा सतत लक्षांत ठेवलेला संदर्भ आणि जोरदार भाषा, यांमुळें मागील शतक व चालू शतक यामधील संधिकालाच्या वेळचें जीवन त्यांनीं फार प्रभावीपणें उभें केलें आहे. अर्थात् विधानांच्या पुष्टचर्थ त्यांनी जे पुरावे सादर केले आहेत, त्याचे संदर्भ नसणें ही या पुस्तकांतील एक महत्वाची उणीव आहे. ही उणीव विशेषत्वानें जाणवते, ती लेखकानें मराठी नाटकाची पूर्वपीठिका दिली आहे, ती वाचतांना. या उणीवेमुळें लेखकानें दिलेले पुरावे तपासून पाहाणें कठीण आहे. पण यापेक्षांही एका वेगळ्या अर्थानें हें पुस्तक आकर्षक आहे. लेखकाचा वोडस, मामा वरेरकर, आणि इतर कांहीं यांच्यावर भयंकर राग आहे. खाडिलकरांना या पुस्तकाचे नायक म्हटलें, तर बोडसांना खलनायक म्हटलें पाहिजे. प्रारंभीच्या निवेदनापासूनच लेखकानें बोडसांच्या वस्त्रहरणाला (किंवा खरें पाहातां सालटीं सोलायला) सुरुवात केली आहे. 'पुरस्कारा'मध्यें केशवराव दात्यांनींही 'मम' म्हटलें आहे. पण पुस्तकभर व विशेषतः 'खाडिलकरांचा यज्ञ' या प्रकरणांत लेखकानें बोडसांच्या बद्दल लिहिलें आहे. तें 'ब्लिट्झच्या' सनसनाटीपूर्ण शैलीची आठवण करून देणारे आहे. शिवाय शंकरराव मुजुमदारांचें 'दारूचें' व्यसन, देवलांना पाय चेपायला स्त्रीपार्टी नटच लागे, ही हकीगत आणि तत्सम इतर गोष्टी लेखकानें चविष्टपणें सांगितल्या आहेत. पण हा स्पष्टवक्तेपणा खाडिलकरांच्या खाजगी आयुष्यावद्दल दाखविण्यांत आलेला नाही. खाडिलकरांचें खाजगी आयुष्य पूर्णपणें निरपवाद असतें, तर पुण्यामध्यें आजही खाडिलकरांच्या ज्या कांहीं गोष्टी सांगितल्या जातात, त्या कां वोलल्या गेल्या असत्या.

'दोन टक्के प्रेक्षक' ही लेखकाच्या हल्ल्याचा कुचेष्टेचा विषय झाला आहे. पण या दोन टक्केवाल्यांच्या मुद्यांना लेखकानें तर्कशुद्ध उत्तर दिलेले नाहीं.

या पुस्तकांचा प्रमुख दोष म्हणजे अनावश्यक फाफटपसारा, आपला आवेश पुनः पुन्हां (कांहीं वेळां, आठदहा वेळां) सांगितल्याशिवाय व्यक्त होणार नाहीं, असें लेखकाला वाटत असावें. ही पुनरावृत्ति आपण मुद्दामच करीत असल्याचें लेखकानें आरंभींच सांगून टीकाकारांचें तोंड वंद करण्याचा प्रयत्न केला आहे, तरीहि ही पुनरावृत्ती अतिशय दोषपूर्ण व अनावश्यक वाटते. त्याचप्रमाणें लेखकाची स्वतःवद्दलची माहिती, वडोदा, मिरज, वंगलोर येथील मुक्काम इ. संबंधीची माहिती अति विस्तार व विनमहत्वाच्या तपशीलांचा मोह, यामुळें या पुस्तकाच्या पृष्ठसंख्येंत भर पडली असली तरी गुणवत्तेंत उणेपणा येतो, असें वाटतें.

या पुस्तकांतील माहितीचा मराठी नाटकाच्या—विशेषतः नाटकमंडळ्या इत्यादींचा—अभ्यास करणाऱ्याला फार उपयोग होईल. आणि खाडिलकरांच्यासंबंधीं लेखकानें इतकी माहिती दिली आहे, कीं यापुढें खाडिलकरांच्या संबंधीं लिहितांना या पुस्तकाला ओलांडून जाणें किंवा त्याच्याकडे दुर्लक्ष करणें कुणालाही शक्य नाहीं.

एकूण या पुस्तकामध्यें आठवणी, चरित्र, नाटचेतिहास, चर्चा आणि शिव्या इ. घटक आहेत. ज्याला जे आवडतील ते त्यानें घ्यावें. येवढेंच या पुस्तकावर लिहिलें, तरी पुरे.

—प्रा. प्रभाकर परांजपे

[नाटककार खाडिलकर: लेखक—श्री. पु. रा. लेले. प्रकाशक—जोशी आणि लोखंडे प्रकाशन पुणें २. किंमत १० रुपये.]








# महाराष्ट्राच्या ग्रामीण विभागांत विजेमुळे समृद्धीचा मार्ग खुला

विजेमुळें जीवनांत अनेक सुखसोयी उपलब्ध होतात. आतापर्यन्त फक्त शहरांतूनच असणाऱ्या अशा बऱ्याच सुखसोयी आज महाराष्ट्रांतील अनेक गांवांना मिळाल्या आहेत. विजेमुळें शेतमालाच्या उत्पादनांतहि वाढ करता येते, व लहान उद्योगांचा विकास करता येतो. तेव्हा ग्रामीण विभागांत वीज गेल्यानें स्थानिक अशी ग्रामीण अर्थरचना निर्माण करण्यास मदत होते.

महाराष्ट्राच्या ग्रामीण विभागास वीजपुरवठा करण्याच्या बाबतीत झालेली प्रगती समाधानकारक आहे. पहिल्या महाराष्ट्र [illegible] गावांना वीजपुरवठा करण्याचा [illegible] [illegible]

